# पहिली लाट

वि. स. खांडेकर

१५ जून १९४०



किं. १॥ रुपया

## तुषार :—

१९३० साली 'नवमल्लिका' हा माझा पहिला कथासंग्रह प्रसिद्ध झाला. येत्या दहा वर्षांत आपले आणखी दोन तीन तरी कथासंग्रह प्रसिद्ध झाले पाहिजेत असें मनोराज्य त्यावेळी मी करीत होतो. त्यामुळें आज : चवदावा कथासंग्रह रसिकांना सादर करतांना आपण स्वप्नांत तर नाहींना अशी शंका माझ्या मनांत क्षणभर डोकावल्यावांचून राहत नाही. म्हणीमधें 'आंधळा मागतो एक डोळा नि देव देतो दोन' हा चमत्कार नेहमीच दृष्टीला पडतो. पण व्यवहारांत आंधळ्याला तीन डोळे देण्याचीही देवाला कधी कधी लहर येते असें माझ्या अनुभवावरून मला वाटतें.

मात्र पुराणांतरीं शंकराचा तिसरा डोळा बंद्य मानला गेला असला तरी सत्यसृष्टींत एखाद्या मनुष्याच्या कपाळावर तिसरा डोळा उगवलेला दिसला तर लगेच त्याची 'भयंकर प्राण्यांत' गणना झाल्याशिवाय राहणार नाही. वाघसिंहांना रंगणांत खेळविणारा सर्कसवाला सुद्धां असल्या मनुष्याकडे पाहून पोबारा करील !

अलीकडे वर्षाकांठीं माझे दोनतीन संग्रह प्रसिद्ध होऊं लागल्यामुळें आणि दहा वर्षांत चौदा संग्रह प्रसिद्ध करण्याची संधि मला [illegible]

रसिक ने दिल्यामुळें दहापांच ओळींत कुठल्याही पुस्तकाचा प्रामाणिक पराम घेणारे का.े झटपट टीकाकार माझ्या कथालेखनाविषयीं लिहितांना वरील सर्कसव. वी साशंक वृत्ति प्रगट करूं लागले आहेत. त्यांच्या समाधानासाठीं व हा सं' ह आवडीने चाळणाऱ्या वाचकांसाठीं मी ही छोटी कैफियत सादर करीत आहे.

* * *

या टीकाकारांना नेहमी एक रुखरुख लागलेली दिसते — विपुल लिहिणाऱ्या लेखकाचें सारें लेखन चांगलें होणें कसें शक्य आहे? कलाकृतींची विपुलता कलाकाराच्या प्रतिभादारिद्र्याची दर्शक असते असा या चिन्तातुर सज्जनांनी आपल्या मनाशीं ठाम सिद्धांतच बांधून ठेवलेला असतो. वरेरकर, फडके, खांडेकर प्रभृति लेखक विपुल लेखन करूं लागल्यामुळें त्यांचें लिखाण हिणकस होत चाललें आहे अशी हांकाटी केली नाही तर आपला मार्मिकपणा लोकांच्या डोळ्यांत भरणार नाही असेंच त्यांना वाटत असावें! जणु कांही एखाद्या लेखकाने वर्षाकांठीं चारदोन गोष्टी लिहिल्या तर त्याच्या लेखनांत चारदोन माणसांकरितांच केलेल्या कुटुंबांतल्या अन्नाची चव असते आणि तो वर्षाकांठीं वीसपंचवीस गोष्टी लिहूं लागला कीं त्याच्या लेखणींत खाणावळींतल्या अन्नाचा नीरसपणा निर्माण होतो! लेखकाला आपली प्रत्येक कृति अपत्यासारखी वाटत असते या गोष्टीचा फायदा घेऊन हे टीकाकार उद्यां मोठ्या गंभीरपणाने म्हणूं लागतील 'घरांत वर्षाचा पाळणा सुरू झाला कीं पुढलीं पुढलीं मुलें अशक्त होतात हा अनुभव कुणाला नाही! विपुल लेखनालाही हाच नियम लागू आहे!'

या आक्षेपकांना प्रथमच एक प्रश्न विचारावासा वाटतो—वरेरकर, फडके, खांडेकर खरोखरच विपुल लेखन करीत आहेत काय? हा प्रश्न प्रत्यक्ष त्या लेखकांना — तर ते उत्तर देतील 'आमच्या मनांत खूप खूप लिहायचं!

.. सुचतं तेवढं सारं लिहायला—मनासारखं लिहायला—आम्हां मराठी लेखकांना स्वास्थ्य आहे कुठं ? वेल्सच्या लिहिण्याच्या खोलींत तीन चार टेबलांवर चार नवीन ग्रंथांचीं हस्तलिखितें पडलेलीं असतात आणि लेखकमहाशयांची स्वारी लहर लागेल त्याप्रमाणें या किंवा त्या पुस्तकाचें लिखाण दररोज पांचसहा तास ..ीत असते, हें वाचतांना एक अद्‌भुतरम्य चित्र तुमच्या डोळ्यापुढें उभें ..हतें ना ? हा चमत्कार आम्ही सुद्धां करून दाखवूं. पण—'

लेखकांच्या मनोराज्यांच्या आड येणारा हा पणच टीकाकारांच्या टीकेपेक्षां अधिक खरा आहे. फडक्यांनी 'कुलाब्याची दांडी' १९२३ सालीं लिहिली तेव्हांपासून गेल्या सतरा वर्षांत अवघ्या बारा कादंबऱ्या त्यांनीं मराठी रसिकांना दिल्या ! प्रतिभेच्या ऐन बहरांत एका प्रमुख व लोकप्रिय कादंबरी-काराने इंग्लंड—अमेरिकेंत एवढेंच वाङ्मय निर्माण केलें असतें असें कोण म्हणेल ? तिकडे लिंड आणि ल्यूकस यांनीं वर्षानुवर्षे आठवड्याला लघुनिबंध लिहून अनेक संग्रह प्रसिद्ध केले असतांना काणेकरांचे मात्र अवघे चार छोटे लघुनिबंधसंग्रह असावेत हें विपुलतेचेंच लक्षण का ! वुडहाउसच्या मानानें अत्र्यांचें लिखाण म्हणजे हिमाद्री पुढें सह्याद्रि ! माडखोलकरांच्या हातून एव्हांना चांगला हजार पांचशें पृष्ठांचा मराठी वाङ्मयाचा इतिहास निर्माण व्हायला पाहिजे होता ! आणि चेकाव्ह, मोपाँसा, ओ. हेन्री प्रभृतींच्या गोष्टींची संख्या पाहिली तर खांडेकर, य. गो. जोशी, कृष्णाबाई व लक्ष्मणराव सरदेसाई यांची कथानिर्मिति अद्यापि रोडकी आहे असाच रसिक वाचकवृंद निर्णय देईल.

'लांडगा आला रे आला' अशी खोटी हाकाटी करणाऱ्या इसाप-नीतींतल्या पोरांपुढें एके दिवशीं जसा खरा लांडगा दत्त म्हणून .. राहिला, त्याप्रमाणें विपुल वाङ्मयाची तक्रार करणाऱ्या या टीकाकारांपुढें क.. .. चार

ांच ५०दं ऱ्या आणि पांचपन्नास गोष्टी लिहिणारे दहाबारा लेखक उभे राहिले र त्यां ं ाय तिरपीट उडेल याची कल्पनाहि करवत नाहीं! मी मात्र त्या ावें लेख५. वें मोठ्या आनंदाने स्वागत करीन.

*　　　*　　　*

गुण आणि संख्या यांचें नेहमीं व्यस्त प्रमाण असतें या समजुतीनेच ब्येक टीकाकार विपुल लेखनाविरुद्ध आपलें मत बनवून घेत असावेत! पण । गृहीत धरतात तो सिद्धांत कलेच्या प्रांतांत कितपत सत्य आहे? एखाद्या जमिनींतून सतत पिकें काढीत गेलें तर ती निकस होते हें खरं! पण एकीकडे पेकें घेत असतांना दुसरीकडे जमिनीला भरपूर खत मिळावें अशी व्यवस्था करणें अशक्य असतें काय? विपुल लेखन करणाऱ्या प्रतिभावान लेखकापाशीं शेतकऱ्याचें शहाणपण असतेंच असतें! वाचन, प्रवास, जीवन इत्यादिकांतून आपल्या प्रतिभेचें पोषण कसें करावें हें त्याला आपल्या आक्षेपकाच्यापेक्षां अधिक चांगलें समजतें.

आणि केवळ निर्मिति कमी केल्यानें का कलाकृतींतले गुण वाढत असतात? ग्रे कवीने वर्षानुवर्षें परिश्रम करून सुप्रसिद्ध 'स्मशानगीता' ची चना केली पण त्या गीता इतक्याच सुंदर कविता विपुल लेखन करणाऱ्या शेले ायरननी एकेका दिवसांत—किंबहुना चारचार घटकांत-लिहिल्या आहेत, आजचे वि लिहीत आहेत. कलाकृतींच्या निर्मितीला घिसाडघाई उपयोगी नाही हें कुणीही कबूल करील. पण याचा अर्थ दिरंगाईने ती अधिक सुंदर होते असा मुळींच नाही. कलाकाराच्या व्यक्तिमत्तेतून (Personality) कलाकृतीची नेर्मिति होत असते. ती व्यक्तिमत्ता जोंपर्यंत सजीव आणि विकासशील आहे ोंपर्यंत ति निर्माण केलेल्या कृतींत सौंदर्य व सजीवता यांचा आढळ ान्याव . विपुल लेखनामुळें लेखकाला परिष्करणाला अवसर मिळणार

नाही, लहानसहान दोष नाहीसे केल्यामुळें कलाकृतीला येणारी सफा', त्यान्च्या कृतींत आढळणार नाही. पण त्याचे आत्मीय कलागुण त्याच्या निर्मितींत प्रतिबिंबित झाल्यावांचून राहतील का ?

*     *     *

विपुल लेखनामुळें एखादेवेळीं तोचतोपणा येऊन लिखाण नीरस होत असेल. पण अखंड लेखनामुळेंच लेखकाच्या भाषेला अकृत्रिम सौंदर्याची प्राप्ती होते. एवढेंच नव्हे, तर विचार आणि कल्पना यांच्यांत नावीन्य आणण्याची महत्वाकांक्षाहि त्यान्च्या मनांत उत्पन्न होते! कवितालेखनाला खंड पडल्यामुळें बालकवीसारख्या प्रतिभाशाली कवीची स्थिति किती केविलवाणी होत असे हें त्यांच्या पत्रांतल्या खालील उद्गारांवरून दिसून येईलः

"माझी एकहि कविता नाही. मी आतां कविच राहिलों नाही! असो! काय उपाय?"

"कविता मात्र (रजनीमातेचें आवाहन ही) अभ्यास मोडल्यामुळें बोजड झाली आहे."

अभ्यास या शब्दाचा शाळेच्या चिमण्या जगाबाहेर कुठल्याहि गोष्टीशी संबंध नाही असे मानण्याचा आपल्याकडे प्रघात आहे. पण कलेच्या जादूच्या जगांत प्रवेश करणाराचा 'अभ्यास' हाच परवाना आहे. परवा 'माणूस' बोलपट पाहिल्यानंतर 'सिंहगड' बोलपट पाहण्याचा योग मला आला. या दोन्ही बोलपटाचे दिग्दर्शक शांतारामच आहेत. पण दोन्हीच्या दिग्दर्शन-गुणांत मात्र विलक्षण अंतर आहे. परदेशी बोलपटाला शोभून दिसेल असें दिग्दर्शन करण्याइतकी शांतारामाच्या कलागुणांत अवघ्या सहा वर्षांत कशामुळें प्रगति झाली? उत्तर एकच येईल—'अभ्यास'- मध्यंतरीचे अनेक बोलपट काढतांना कलावंताच्या प्रतिभेने केलेला अभ्यास.

वि ल लेखन लेखकाच्या अभ्यासाला व पर्यायाने विकासाला अत्यंत युक्त ... . दररोज चारसहा घटका तंबोरा घेऊन बसणारा गायकच जशी ल रंग . कतो, त्याप्रमाणें सतत लिहित राहणारा प्रतिभाशाली मनुष्यच नेकदा असामान्य सुंदर असें लेखन करूं शकतो. विपुल लिहिणाराने आपलें लेंहि लिखाण आपल्या सर्वसामान्य कृतीपेक्षा निकृष्ट दर्जाचें नाही एवढी ता घेतली म्हणजे झालें. त्याची प्रत्येक कृति अत्युत्कृष्ट नाही म्हणून राशा प्रगट करणें हें हिमालयाचीं सर्व शिखरें काचनगंगेइतकीं उत्तुंग हीत म्हणून नाक मुरडण्यासारखेंच हास्यास्पद नाही काय ? आणि असामान्य ाकृति काय केवळ दीर्घकाल परिश्रम करून निर्माण होते ?

* * *

विपुल लेखनामुळें लेखकाच्या लिखाणांत तोचतोपणा येऊं लागतो हा क्षेप थोडासा खरा आहे. पण तसें पाहिलें तर तोचतोपणा कुणा लेखकांत हीं ? हार्डीसारखा इंग्रजी भाषेतला अव्वल दर्जाचा कादंबरीकार घ्या किंवा ासारखा नोबेल प्राइझ मिळविणारा हिंदी कवि घ्या. हार्डीच्या कादंबऱ्या पण क्रमाने वाचूं लागलो तर त्याच्या कितीतरी कल्पना, कितीतरी प्रसंग, बहुना कितीतरी भावना पुनरुक्त वाटूं लागतात. त्याच्या सुंदर सृष्टिवर्णनांत ां पुढें पुढें तोचतोपणा (Monotony) आहे असा भास होतो. टागोरांच्या वक्तेचीही तीच स्थिति आहे. Gardener मधली एखादी कविता वाचली तिचें सौंदर्य आपल्याला मोहिनी घालते. पण सर्व कविता आपण एका ांत वाचूं लागलो तर सौंदर्य ग्रहणाच्या बाबतीत आपल्या बुद्धीला एक रची बधिरता येते. भुके पोटीं कोंड्याची भाकरी गोड लागावी आणि ल्या पोटी श्रीखंडाचा वीट यावा हें मनुष्यस्वभावाला धरूनच आहे. पण त विचारि. श्रीखंडाचा काय दोष आहे ? विपुल वाङ्मय लिहिणाराची ानसह ब सुद्धां वाचकांना इतकी परिचित झालेली असते की त्याचे

नवें लिखाण गोड असूनही विलक्षण नाविन्याच्या अभावीं रसिकांना किंचित् सपक वाटतें !

*           *           *

पण संपूर्ण नावीन्य ही वाचकांच्या दृष्टीने जेवढी इष्ट तेवढीच लेखकाच्या दृष्टीने अतिशय अवघड अशी गोष्ट आहे. लेखकाची व्यक्तिमत्ता ही कांही पातळांची फॅशन नव्हे कीं ती वर्षसहामहिन्यांत सहज बदलू शकेल. आनुवंशिक संस्कार, बालपणींचे अनुभव, शिक्षणाने निर्माण केलेलीं ध्येयें, विविध वाचनाचे अंतर्मनावर झालेले परिणाम, परिस्थितीचे पडसाद इत्यादिकांच्या मिश्रणामुळें लेखकाच्या प्रतिभेला एक विशिष्ट स्वरूप प्राप्त झालेलें असतें. त्याच्या आवडीनिवडी, त्याच्या आशा आकांक्षा, त्याच्या भावभावना, त्याचें सामाजिक तत्वज्ञान, त्याचा जीवनविषयक दृष्टिकोन या साऱ्या गोष्टींनी त्याची व्यक्तिमत्ता सजीव झालेली असते. ही व्यक्तिमत्ता मेणासारखी मऊ नसते; तर लोखंडासारखी कठीण असते. लोखंड अतिशय तापविल्यावांचून जसें वितळवितां येत नाहीं, त्याप्रमाणें अत्यंत मोठ्या व प्रक्षोभक अशा अनुभवांखेरीज लेखकाच्या व्यक्तिमत्तेंतही क्रांतिकारक बदल घडून येत नाहीं. त्यामुळें लेखक विकासशील असला तरीही त्याच्या सर्व लिखाणावर एकप्रकारच्या सारखेपणाची छाया पसरलेली दिसते. या सारखेपणाबद्दल पदोपदीं तक्रार करणें म्हणजे कलेच्या निर्मितीबद्दल व कलाकाराच्या व्यक्तिमत्तेबद्दल अज्ञान व्यक्त करण्यासारखें आहे. वामनरावांच्या कादंबऱ्यांतलीं पात्रें चिंतनशील नसलीं तरच नवल ! फडक्यांच्या सृष्टींतील नायकनायिका प्रणयव्याकुल अथवा विरहविव्हल झाल्या नाहींत तरच आपल्याला आश्चर्य वाटेल ! उद्यां वरेरकरांनी एखादी 'सिंधू' निर्माण केली तर रसिकांना ती त्यांची दत्तक मुलगी वाटण्याचाच अधिक संभव आहे. कालिदास, भवभूति आणि शूद्रक किंवा शॉ, गॅल्सवर्दी व मॉ[illegible] मर्यादा

लक्षांत घेऊन आपण त्यांच्या कलाकृतींचा रसास्वाद घेऊं शकतोच कीं नाही ? मग काळ व स्थळ या दोन्ही दृष्टींनी आपल्याला निकट असलेल्या लेखकांच्या बाबतींतच अधिक कांटेकोर वृत्ति वापरणें हें निष्ठुरपणाचें नसलें तरी अरसिकपणाचें लक्षण नाही का ठरणार ?

*　　　*　　　*

'चवदावा कथासंग्रह' यांतील चवदावा या शब्दाकडे पाहून या संग्रहाविषयी अभिप्राय देऊं इच्छिणारांना लेखकाची बाजू थोडीशी कळावी या दृष्टीने एवढा विस्तार केला. पण या संग्रहाला 'पहिली लाट' हें नांव देण्याचें कारण विनयाचें निष्कारण प्रदर्शन हें नाही किंवा यांत पहिली लाट या नांवाची एक गोष्ट आहे हेंही नाहीं. कथालेखक या दृष्टीने माझी अजून किती प्रगति व्हावयाची आहे याची मला पूर्ण जाणीव आहे. भरती पूर्ण झाली की समुद्राच्या वाळवंटाला जी शोभा येते ती या संग्रहांत वाचकांना आढळणार नाही हें मला पूर्णपणें ठाऊक असल्यामुळेंच मी त्याचें 'पहिली लाट' असें नामकरण केलें. पहिलें चुंबन, पहिलें फूल, पहिलें मूल, इत्यादिकांत अधिक गोडी असते म्हणतात ! 'पहिल्या लाटे' तही ती वाचकांना आढळली तर मला आनंदच वाटेल.

माझ्या इतर संग्रहांप्रमाणें या संग्रहांतही मी विषय आणि तंत्र या दोन्ही दृष्टींनी शक्य तितक्या विविध गोष्टी समाविष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. या सर्व गोष्टी सर्वांना आवडतील असें मला मुळींच वाटत नाही, किंबहुना आपल्या सर्व गोष्टी सर्वांना आवडूं नयेत असेंच मला वाटतें. कारण लेखकाप्रमाणें वाचकालाही व्यक्तिमत्ता असते. अर्थात् त्या व्यक्तिमत्तेला आवाहन देणाऱ्या कथा त्याला आवडाव्यात हें स्वाभाविकच आहे. संग्रहांतली प्रत्येक गोष्ट कुणाना कुणा वाचकाला आवडली की ती लिहिण्याचे श्रेय लेखकाला मिळालें असें मी समजतों.

तथापि कित्येक गोष्टींची स्थिति काही कांही चित्रांसारखी अस
वर वर पाहणाऱ्याला त्यांत विशेष आकर्षक असें कांहीच दिसत नाही.
'प्रणयिनीचा मनोभंग' या चित्रांतलें सौंदर्य शिवरामपंत परांजप्यांच
कलमाने जसें प्रगट करून दाखविलें त्याप्रमाणें कित्येक कथांचें अस
सौंदर्य कुणीतरी वाचकांच्या नजरेला आणण्याची जरूरी असते.
संग्रहांतल्या रूपककथा किंवा 'खोल, खोल' सारख्या गोष्टी काही लोका
अर्थहीन किंवा नीरस वाटण्याचा संभव आहे. त्या तशा नाहीत अ
मला वाटतें. लघुकथा ही कादंबरीपेक्षां काव्याला अधिक जवळ आहे,
ज्यांना मान्य असेल त्याना या कथा कळायला अथवा आवडाय
हरकत नाहीं, पण चमत्कृतिजनक घटना किंवा वैचित्र्यपूर्ण प्रसंग ह
आपल्याकडे अद्यापि लघुकथेचा आत्मा मानला जातो. त्यामुळें ज्या गोष्ट
उत्कंठावर्धक कथानक स्पष्टपणें दिसत नाही, ती सर्वसामान्य वाचकवर्गाला बहु
आवडत नाही.

मराठी लघुकथेची प्रगति मुंगीच्या पावलांनी होत आहे याचें कार
शोधायला दूर जायला नको. बहुतेक कथालेखक मध्यमवर्गातले. घरांतल
एखाद्या कोंपऱ्यांत लहान मुलांमुलींनी आपला खेळ मांडावा, त्याप्रमा
समाजाच्या एका कोंपऱ्यांत बसून त्यांना आपला वाङ्मयसंसार थाटा
लागतो. ते जें जीवन पाहतात त्यांत मानसिक संघर्ष अधिक. चमत्कृतिजन
घटना फार थोड्या. पण केवळ घटकाभर करमणुकीसाठी गोष्टी वाचणाऱ्य
त्यांच्या वाचकवर्गाला मनांतलीं सूक्ष्म आंदोलनें पाहण्याची सहसा इच्छ
होत नाही. कांहीतरी धक्का देणारें, डोळे दिपविणारें, खोखो करून हंसविणा
किंवा वरवर रडविणारें त्याला अधिक आवडतें. आपण वाचतों तें किती खो
आहे, किती कृत्रिम आहे, जीवनांतल्या अनुभवांशी किती निसंगत आहे

चा विचार करीत बसायला आमच्या वाचकांना बहुधा वेळ नसतो आणि ांना तो असतो त्यांना विचार करण्याची इच्छाच नसते !

*        *        *

'कुंडीतलीं फुलझाडें' ही या संग्रहांतलि गोष्ट प्रसिद्ध झाली तेव्हां नेकांना ती कशीशीच वाटली. गोष्टीचा काल युरोपांत दुसरें महायुद्ध सुरू ल्याचा ! नायिकेचा पति परदेशीं गेला आहे अशी परिस्थिती ! अर्थात् तो त येत असतांना त्याची आगबोट बुडविली जावी, इकडे तो नाहींसा झाला णून पत्नीने प्राण डोळ्यांत आणावें आणि ती दुःखाने आत्महत्या करणार शा वेळीं आकस्मिक रीतीने जीव बचावून आलेला तिचा नवरा घरीं परत वा असें कांहीतरी या गोष्टींतलें कथानक असायला हवें होतें अशी या ष्टीच्या आक्षेपकांची अपेक्षा असावी ! पण लेखकाने गोष्टींत तसली कांहींच ःबड उडवून दिली नाहीं हें पाहून त्यांचा विरस झाला. महायुद्धाच्या पार्श्व-मीवर आपल्या मध्यमवर्गातल्या स्त्रीचें दुबळें मन चित्रित करणें हा त्या ष्टीचा आत्मा आहे, इकडे अनेकांचें लक्षच गेलें नाही. कथेचें सूचक त्र, दाढदुखीच्या प्रसंगाने व्यक्त केलेला नायिकेच्या मनाचा दुबळेपणा. यादी गोष्टी मामुली स्वरूपाच्या मानण्याकडे वाचकांचा जो कल झाला, ाला गोष्ट म्हणजे एखाद्या अद्‌भुत, कल्पनासुंदर, किंवा चमत्कृतिजनक ानेचें चित्रण ही प्रचलित कल्पनाच मुख्यतः कारणीभूत आहे.

ही कल्पना सर्वस्वी चुकीची आहे असें कुणीच म्हणणार नाहीं. पण थानक (Plot) हाच गोष्टीचा आत्मा असला पाहिजे हा जुना दंडक त्र मराठी कथावाङ्मयाच्या पुढील विकासाला बाधक झाल्यावांचून राहणार ाही. मानसिक द्वंद्वें, वायुलहरीवरून येणाऱ्या मंद सुगंधाप्रमाणें मनाला णमात्र फुलवून जाणाऱ्या भावनांच्या छटा, दैनंदिन जीवनांतले विचारांचे बिकारांचे बहुविध तरंग हे सर्व लघुकथांचे विषय होऊं शकतात. विविध ा भरल्यामुळेंच चित्रें मोहक होतात असें नाहीं. कित्येकदां नखचित्रें सुद्धा

अत्यंत सुंदर असतात. कॅरेन हिल् हें नांव आपल्याला ऐकून सुद्धा ठाउ नाहीं. पण At Evening या नांवाची या लेखकाची लघुकथा पहा. ग पुरी हजार शद्वांची सुद्धां नाही. तिच्यांत तत्व नाही, प्रचार नाही कां नाही. रात्र पडल्यावर एक गृहिणी बाहेरून घरी परत येते. तिचीं मुलें झो गेलीं आहेत, स्वतःच्या खोलींत नवराही निद्राधीन झाला आहे, कुणी जागें नाही. घरीं—आपल्या जगांत—परत आल्याचा आनंद आ निःशद्व घरांत उत्पन्न होणारी एकलेपणाची हुरहुर यांच्या मिश्रणा तिच्या मनाची जी चमत्कारिक स्थिति होते तीच या गोष्टीच आत्मा आहे. तिचा नवरा आणि मुलें जागीं होतात तेव्हांच्या वर्णनाच चित्रें तर वाचक कधींही विसरणार नाही अशीं रेखीव आहेत.

मराठी लेखकांनी कथेच्या असल्या नव्या नव्या क्षेत्रांत पदार्प करण्याची वेळ आली आहे असें वाचकांच्याही मनांत आल्यावांचून राहणा नाही.

या संग्रहांतल्या गोष्टींविषयीं अधिक कांही सांगण्याची आवश्यकत आहे असें मला वाटत नाहीं. माझ्या लेखनांतले सर्व गुणदोष त्यांच्यां प्रतिबिंबित झाले आहेत. कांही सांगायचेच तर बेटस्च्या शद्वांत वाचकांना मी एवढेंच म्हणेन, 'They (the readers) are not asked to accept a philosophy, a point of view, a creed, a moral, a sermon on good or evil. The best, I can hope, is that they will read these stories with something of the spirit in which they were written: for pleasure, and out of a passionate interest in human lives.'

राजारामपुरी
कोल्हापूर,
९-५-१९४०

वि. स. खांडेकर

## खांडेकर–वाङ्मय

# आ गा मी

**दंबऱ्या**

वृन्दावन
छाया
चार भिंती
तिसरी भूक
वर्षाकाल
जगन्नाथाचा रथ
मत्स्यगंधा
चांभाराचा देव
लंकादहन
मुका मार
क्रौंचवध

**बोलपट**

धर्मपत्नी
मत्स्यगंधा
पूजा
अमृत
पहिलें चुंबन
त्याग

**इतर**

श्री. कृ. कोल्हटकर [टीका]
इब्सेन [टीका]
पडद्याआड [चित्रपटचर्चा]

**कथासंग्रह**

सूर्यकमळें
मंजिऱ्या
कलिका

**लघुनिबंध**

अविनाश
वालुका

---

## खांडेकरांचीं नवीन पुस्तकें १९४०

**पहिली लाट** — सुंदर लघुकथा संग्रह ( किंमत १॥ रु. )

**धुंधुर्मास** — खांडेकरांचा दुसरा टीकासंग्रह. या संग्रहांत विविध व चटकदार चवदा टीकालेख समाविष्ट केले आहेत. किं. १ रु.

**सूर्य कमळें** — कथा संग्रह ( ऑगष्ट १९४० )

**तिसरी भूक** — कादंबरी ( सप्टेंबर १९४० )

**छाया** — कादंबरी (नोव्हेंबर १९४०)

**चार भिंती** — कादंबरी (डिसेंबर १९४०)

दक्षिण कोंकणांतले आदर्श समाजसेवक

कै. आबासाहेब देसाई

[ कृ. सी. देसाई ]

व

आप्पासाहेब पटवर्धन

[ सी. पु. पटवर्धन ]

यांस

# वीणा प्रकाशन

| | | | |
|---|---|---|---|
| १ | समरभूमि | ना. सी. फडके | १॥ रु. |
| २ | स्वैरविचार | ग. त्र्यं. माडखोलकर | १॥ रु. |
| ३ | दोन मनें | वि. स. खांडेकर | २ रु. |
| ४ | कांता | ग. त्र्यं. माडखोलकर | २ रु. |
| ५ | अविष्कार | गीता साने | १॥ रु. |
| ६ | हेमलता | द्वा. वा. घाटे | १ रु. |
| ७ | पांढरे ढग | वि. स. खांडेकर | २ रु. |
| ८ | निष्कलंक | कमल दीक्षित | १ रु. |
| ९ | विशाल जीवन | पु. य. देशपांडे | २ रु. |
| १० | उषःप्रभा | प्र. शां. मांजरेकर | १। रु. |
| ११ | झंझावात | वि. वि. बोकील | २ रु. |
| १२ | पहिली लाट | वि. स. खांडेकर | १॥ रु. |
| १३ | साकी | बी. रघुनाथ | १ रु. |
| १४ | मुखवटे | ग. त्र्यं. माडखोलकर | .... .... .... |
| १५ | ! | पी. वाय्. देशपांडे | .... .... ... |
| १६ | चार भिंती | वि. स. खांडेकर | ... .... .... |

आपल्या वाचनालयांत हीं अवश्यसंग्रहणीय पुस्तकें अजून आलीं नसल्यास आजच मागणी करा.

# १

## पहिली लाट—

‘ए चालु, खाऊन घे, पोटभल खाऊन घे.’ तोंडांत बटाटेवडा कोंबलेला असल्यामुळे माधवच्या शब्दांना आपोआपच थोडासा बोबडेपणा आला होता! अर्थात् त्याच्या अपेक्षेपेक्षाहि जमलेल्या मंडळींत अधिक हशा उत्पन्न झाला. आपल्या विनोद निर्माण करण्याच्या शक्तीविषयी आत्मविश्वास उत्पन्न झाल्यामुळेच की काय, तोंड थोडेसें मोकळें होतांच तो म्हणाला, ‘मित्रा चारुदत्ता, इंग्लंडमधे बटाटेवडा नाही आणि मृदुलाहि नाही. तेव्हा खूप खूप बटाटेवडे खाऊन घे आणि मृदुलेकडे तासन्तास टक लावून पाहत बैस.’

माधवच्या या भाषणाने चारुदत्त एरवी हसला नसता; पण लहान मुलाप्रमाणे प्रणयी मनालाहि गुदगुल्या करून घेण्याची इच्छा असते हेंच खरें!

चारुदत्त हसला म्हणूनच मृदुलाहि हसली. नाहीतर पोक्तपणाचा आव आणण्यांत ती एखाद्या आजीबाईलाहि हार गेली नसती!

रिकाम्या डोक्याप्रमाणे भरलेल्या पोटालाहि नाही नाही ते चाळे सुच माधवच्या बोलण्याने उत्पन्न झालेला हशा शांत होतो न होतो तोंच चारुदत्त दुसरा दोस्त मधुकर म्हणाला,

' अहो, मालतीमाधव—'

मृदुलेच्या पलीकडे बसलेली मालती लाजली. हशाला जरूर तो वेळ देऊन मग आपलें भाषण म्हणणाऱ्या कसलेल्या नटाप्रमाणे मधुकर थोडासा थांबला. हशा विरतांच तो म्हणाला, ' हा माधव शुद्ध भटजी आहे भटजी इंग्लंडमधे बटाटावडा नाही म्हणून केवढा गळा काढलान् लेकानं आता ! '

मृदुलेनें चारुदत्ताला दिलेल्या मेजवानीचा कैफ मधुकराला चढला होता यांत शंका नाही. तो उठून उभा राहिला आणि माधवकडे हात करून म्हणाला, ' हे पेशवाईच्या पूर्वी जन्माला आलेल्या ब्राह्मणा, इंग्लंडमधे बटाटावडा नसला तरी त्याचा बाप सामोसा आहे, हें कसं तुझ्या लक्षांत आलं नाही ? म्हणे इंग्लंडमधे मृदुला नाही ! नसेना ! एक सोडून छप्पन्न वसंतसेना पिंगा घालायला लागतील या चारुदत्ताभोवती ! '

चारुदत्ताने मृदुलेकडे पाहिलें. तिच्या मुद्रेवरून मधुकराचा आचरटपणा मर्यादेबाहेर चालला आहे हें त्याच्या लक्षांत आलें. तो हसत हसत म्हणाला ' मधुकर, तुझ्या या वक्तृत्वाबद्दल सर्व सभा तुझी आभारी आहे. पण — एक गोष्ट तूं विसरलास ! '

' कुठली ? '

' आमचा वाङ्निश्चय झाला आहे ! मी कुठेंहि असलों तरी मृदुलेचीच मूर्ति माझ्या मनांत घोळत राहील ! '

' फुकट, फुकट आय्. सी. एस्. ला चालला आहेस तूं बाबा ! त्यापेक्षा दासबोधाचं निरूपण करीत एखाद्या देवळांत बसला असतास. . . . '

माधवाला पुन्हा वाचा फुटली—' चारुदत्त संस्कृतचा विद्यार्थी असता तर त्याचं म्हणणं एक वेळ आम्हीं खरं मानलं असतं ! मेघदूतातला यक्ष नाही का मेघाबरोबर बायकोला संदेश पाठवीत ? तसा हाहि मृदुलेला प्रत्येक बोटीच्या कप्तानाबरोबर—आणि विरहाने अगदी होरपळून गेल्यावर प्रत्येक विमानाच्या

पायलटबरोबर निरोप पाठवीत राहिला असता ! पण हा आहे इकॉनॉमिक्सचा विद्यार्थी—नुसता आंकड्यांनी खेळणारा ! इकडे भारतवर्षांत आपल्या कमललोचना मदिराक्षीचं नवनीतकोमल हृदय विरहानं करपून त्याचं साजूक तूप झालं असेल हें याला....'

पावसाची मुसळधार सर यावी तसा हशा पिकला. माधवचें काव्य जागच्या जागीं आटलें.

हात धुऊन सर्वांनी विडे तोंडांत टाकले. विड्याने रंगलेले ओठ पुसतां पुसतां मधुकर मृदुलेला म्हणाला, ' मृदुला, तूं उद्या आय्. सी. एस्‌ची बायको होणार असलीस तरी तुझा स्वभाव फार चिक्कू आहे ! '

' तुला एकच विडा मिळाला वाटतं ? '

' अंहं ! एकाच मेजवानींत तूं चारूला निरोपहि दिलास आणि त्याच्याशीं वाङ्निश्चयहि केलास ! '

' बरं, बरं ! लग्नाच्या वेळीं वर्षभर मेजवान्या देईन. मग तर झालं ? '

' म्हणजे आपल्या घराजवळच दवाखाना उघडायला हवा एक ! '

चारुदत्ताच्या या वाक्यानंतर कुणीं गळ्याभोंवती स्कार्फ गुंडाळला, कुणीं डोक्यावर टोपी चढविली आणि एकाने तर अडाणा रागांत ' वंदे मातरम् ' सुरू करण्याचा आव आणला.

' नमस्ते'च्या गडबडींत माधव मनोहरला कोपराने हळूच डिवचून म्हणाला, ' अगदी वन् सीन वन् ॲक्ट टेक्निक् चाललंय् हं ! रंगभूमीवर जरूर नसलेल्या पात्रांनी या नाही त्या निमित्तानं निघून जायचं आणि मग मुख्य पात्रांनी—'

' पण अशा अंकाच्या शेवटी एखादी महत्वाची घटना घडून यावी लागते !'

' आपली पाठ फिरली की घडणारच आहे ती ! '

' काय होणार आहे ? '

' खून नाही ! चुंबन ! '

मनोहर व माधव खो खो हसत कां गेले, हें चारुदत्त व मृदुला यांना कळणें शक्य नव्हतें. पण त्यांच्या त्या हसण्याने दोघांच्याहि मुखांवर स्मित-लहरी खेळूं लागल्या. थट्टेमुळे प्रणयाला निराळीच माधुरी येते यांत शंका नाही.

मित्रमंडळी निघून गेली. दिवाणखान्यात चारुदत्त आणि मृदुला एका संगमरवरी टेबलभोवती समोरासमोर बसलीं. झगझगणारा वि[द्यु]त्प्रकाश असह्य वाटल्यामुळेच की का[य], मृदुलेने एक स्विच् दाबून तो बंद केला. [दु]सरा जवळचा स्विच् दाबतांच छोट्या निळसर झुंबरातला सौम्य प्रकाश सर्वत्र पसरला. त्या मंदमधुर प्रकाशांत चारुदत्ताच्या चेहऱ्याकडे पाहतां पाहतां मृदुलेच्या डोळयात पाणी तरळूं लागलें.

तिचा हात हातांत घेऊन स्निग्ध स्वराने चारुदत्त उद्गारला, 'अगदी कुक्कुबाळ आहेस तूं अजून, मृदु!'

'तसं नाही रे! पण मघासारखी थट्टा ऐकली की नाही नाही तें मनांत येतं.

'काय येतं मनांत? एक गोरी पोरगी तुला सवत म्हणून मी आणीन हेंच ना? मृदुला, प्रेम हा ज्यांना आयुष्यातला एक गमतीचा खेळ वाटत असेल त्यांची गोष्ट निराळी! मला प्रेम ही पूजा वाटते!'

'पूजा?'

'हो, पूजा! देव्हाऱ्यातल्या मूर्तीविषयी भक्ताला काय वाटत असेल, हें मी सहज सांगूं शकेन.'

'काय वाटतं त्याला?'

'साऱ्या जगातली सुंदर फुलं गोळा करून आणावींत आणि तीं आपल्या मूर्तीला वाहावींत; आपल्या मूर्तीचा देव्हारासुद्धा इतका मोहक असावा की लोकांनीं त्याच्याकडे नुसते टकमक पाहत रहावं!'

'तूं आय्. सी. एस्. झाल्यावर काय कमी आहे आपल्याला? गेले सहा महिने मला सुद्धा असलींच स्वप्नं पडतातरे! कालचंच माझं स्वप्न पाहाना—आपल्याच बंगल्यांत एक छानसं टेनिसकोर्ट आहे आणि त्याच्यावर तूं नी मी खेळत आहों; खेळतांखेळतां माझ्या केसांत खोवलेलं फूल खालीं पडतं; तूं धावत येऊन तें घेतोस आणि पुन्हा माझ्या केसांत खोवतोस—मग मी म्हणतें, 'खेळाकडे लक्षच नाही तुझं'–तूं उत्तर देतोस, 'तूं समोर असतांना खेळाकडे लक्ष लागायचं तरी कसं?'

चारुदत्ता ने हसत हसत विचारलें, ' स्वप्नंसुद्धा माझ्याच बाजूनं साक्ष देताहेत म्हणून बरं ! - हीतर हें लग्न मोडून टाकायला सुद्धा-'

त्याच्या तोंडावर हात ठेवून त्याचें बोलणें बंद करीत मृदुला म्हणाली, ' तर तर ! उगीच नाही माझ्या मनाला भय वाटत ! '

' म्हणजे ? '

' तुझ्या मनाचा थांगच लागत नाही मला ! देवावर काडीभरहि विश्वास नाही तुझा पण इंग्लंडला जायच्या पूर्वी आपल्या कुलदेवीचं दर्शन घेऊन यायला हवं असं तुझ्या आजीनं सांगतांच तें मात्र कबूल केलंस तूं ! '

' हें पाहा मृदुला, आजी अगदी पिकलं पान झालं आहे ! आपला नातू आय. सी. एस्. झालेला पाहायला ती राहाणारहि नाही कदाचित् ! तेव्हा तिच्या मनाच्या समाधानासाठी...'

' माझ्या सान्या मैत्रिणी एवढ्यावरनंच चिडवायला लागल्या आहेत मला ! एक म्हणते-उद्या लग्न झाल्यावर तुलाहि नथ घालून आणि कपाळावर मळवट भरून कुलदेवतेच्या दर्शनाला जायला हवं ! दुसरी म्हणते—संभाळ हं बाई, नाहीतर चारुदत्ताची कुठलीतरी पणजी उद्या उपस्थित होईल नी कोपरापर्यंत काकणं भरून गायीला नी तुळशीला प्रदक्षिणा घालायला लावील... '

' टेनिस खेळायचं तें तुळशीला प्रदक्षिणा घातल्या म्हणजे झालं ! '

मृदुलेने मान उडवून ' कांहीतराच काय बोलतोस ? ' असा अभिनयात्मक प्रश्न केला.

' तूं येतेस का आता कोकणांत ? ' चारुदत्ताने चिडविण्याकरिता मुद्दामच तिला विचारलें !

' अंदमानांत जाईन, पण त्या भिकार कोकणांत नाही जाणार कधी ! '

' कोकणांत आंबे कसे झकास मिळतात ! '

' आंबे काय पुण्यामुंबईत राहूनहि खातां येतात ! ' हें उत्तर देतांना मृदुला मोठ्या मिस्किलपणाने हसली.

* * *

आणि आजीबरोबर कोकणांत जाऊन आलेल्या चारुदत्ताचें मृदुलेने जें स्वागत केलें तेहि अशा खोडकर हास्यानेच !

‘ देवीचा अंगारा आणला आहेस ना ? विलायतेंत परिक्षेच्या वेळी आठवणीनं लाव हं तो ! ’ असा टोमणा तिने मारला तरी चारुदत्त स्तब्धच होता.

मग मात्र मृदुलेला त्याचें मौन असह्य झालें.

एकान्त मिळतांच तिने चारुदत्ताला विचारलें, ‘ चारू, माझ्यावर रागावला आहेस तूं ? ’

‘ कांही माणसांवर रागावतांच येत नाही मला ! ’

‘ कोणकोण आहेत तीं भाग्यवान् माणसं ? ’

‘ माझी आजी—लोक तिला भागीरथीकाकू म्हणतात ! माझ्या भावी आयुष्याची स्वामिनी—या तरुणीला मृदुला म्हणून लोक ओळखतात—’

आपल्या नांवाचा उल्लेख ऐकतांच मृदुलेची कळी उमलायला हवी होती. पण चारुदत्ताने आजीची व आपली सांगड घालावी याचें तिला फार वाईट वाटलें. घरोब्यामुळे लहाणपणापासून ती वारंवार चारुदत्ताच्या घरी जात असे; पण चारूच्या आजीचा लळा तिला कधीच लागला नाही. ती पांचसहा वर्षांची असतांना कुणीतरी चेटकिणीची एक गोष्ट तिला सांगितली होती. वर्णन करतांकरतां त्या मनुष्याने ती चेटकीन् कशी दिसत होती हेंहि सांगितलें. चेहऱ्यावर सुरकुत्या असलेली, तोंडांत दोनच दांत उरलेले, नेहमी वाकून चालणारी, विचित्र नजरेने पाहाणारी—त्या चेटकिणीचीं सारीं विशेषणें चारुदत्ताच्या आजीला लागू पडतात असें मृदुलेच्या बालकल्पनेला वाटलें. यामुळे उत्पन्न झालेली मनातली अढी तिने कधीहि बोलून दाखविली नव्हती; पण तिचें निर्मूलनहि झालें नव्हतें. मृदुला मोठी झाल्यावर तिने आजीच्या ज्या गोष्टी पाहिल्या होत्या, त्याहि ही अढी दृढ व्हावी अशाच होत्या. घरांत कुठेहि तांदळाचे चार दाणे पडले असले तरी आजी ते मोठ्या साक्षेपाने उचलून घेत व कोठीच्या खोलींत नेऊन टाकीत. ‘ अन्नाला पायदळीं तुडवूं नये ’ असें त्यांनी या वेळी म्हटलें की छोट्या मृदुलेला ते उद्गार कद्रूपणाचे वाटत. मुलगा वकील होऊन खोऱ्याने पैसा मिळवीत असतांना या म्हातारीने भिकारणीसारखे कां वागावें, हें कोडें कांही केल्या तिला

ढुलगडत नसे. चारुदत्त कॉलेजांत जाऊन पहिल्या वर्गांत परीक्षा पास होऊं लागल्यावरहि आजीने त्याला स्वातंत्र्य दिलें नव्हतें ही गोष्टहि तिला कशीशीच वाटे. चारू उशिरा घरी आला, तर म्हातारी ' कुठं गेला होतास ? काय करीत होतास ? ' असल्या प्रश्नांनी त्याला भंडावून सोडी हेंहि तिने पाहिलें होतें. मृदुलेला साधा चहाहि करतां येत नाही याबद्दल हिणवायलाहि कमी करीत नसे ती. मृदुलेच्या मनांत येई—' आज मी एका बड्या डॉक्टरची मुलगी आहे; उद्या एका आय्. सी. एस्. ची बायको होणार आहे. मला इंग्रजी चांगलं बोलतां येणं अधिक आवश्यक आहे. ज्या मुलीला हॉटेलवाल्याची बायको व्हायचं असेल, तिला ही चहाची कसोटी लावणं बरोबर आहे. पण रुप्याच्या बोंडल्यानं दूध पिऊन, शिसवीच्या पलंगावर निजून आणि कोऱ्या करकरीत मोटा-रींत बसून जिचं बाळपण गेलं, दिवसाला तीन जॉर्जेटचीं पातळं नेसायची मध्या जिला ऐपत आहे, गाण्याचं अंग नसतांना केवळ शोभा म्हणून महिना वीस रुपयाचा गायन-शिक्षक गेलीं दहा वर्षं वडिलांनी जिच्यासाठी ठेवला आहे, त्या मुलीला चहा करतां येतो की नाही हें पाहणं म्हणजे तिचा अपमान करण्यासारखंच नाहीं का ? '

अशा रीतीनें चारुदत्ताच्या आजीविषयी मन कलुषित झालें असल्यामुळे आपलीं प्रिय माणसें सांगताना आजीच्या मांडीला मांडी लावून त्यानें आपल्याला बसवावें हें मृदुलेला आवडलें नाही. त्याची विलायतच्या कपड्यांची तयारी सुरू झाली, तेव्हा मृदुला वारंवार त्याच्याबरोबर जाई. आजपर्यंत मुठींनी पैसे उधळणाऱ्या चारुदत्ताने आपल्या विलायतच्या कपड्यांत काटकसर करायला सुर-वात करावी याचें तिला आश्चर्य वाटूं लागलें. कधी तो किमतीविषयी हुज्जत घाली तर कधी कमी किमतीच्या कपड्यानेहि आपलें काम भागेल असें बोलून जाई. या दोन्ही गोष्टी त्याच्या अथवा मृदुलेच्या–कुणाच्याच श्रीमंतीला शोभण्याजोग्या नव्हत्या !

शेवटी एका दुकानातून बाहेर पडतांना त्रासून तिने चारूला विचारलें, ' आजीनं हल्ली डोक्यावर हात ठेवलेला दिसतोय् तुझ्या ! '

' वडील माणसांच्या आशीर्वादाचं भाग्य फार थोड्या लोकांना मिळतं, मृदुला ! '

× × ×

पण असले खटके विसरून जावेत, असे मधुर प्रणयोद्गारहि त्यांच्या संभाषणांत प्रगट होत. सारी तयारी करतांकरतां एकदां कंटाळून तो म्हणाला, ' पूर्वी परदेशगमन निषिद्ध कां मानीत हें आता कळलं मला ! '

' कां ? '

' एवढी मोठी तयारी करून मिळवायचं काय ? तर आपल्या आवडत्या माणसांचा वियोग ! '

' आवडत्या ' हा शब्द उच्चारतांना त्याने मृदुलेकडे जो भावपूर्ण दृष्टिक्षेप केला होता, त्याच्या गुदगुल्या तिला पुढे कितीतरी दिवस होत होत्या.

कुठल्याशा एका दुकानांत सुंदर मण्याची एक माळ होती. चारुदत्त मोठ्या आस्थेने तिची किंमत विचारूं लागला तेव्हा तर मृदुलेला हसूंच लोटलें. तोंडावर हात धरून ती म्हणाली, ' तूं आय्. सी. एस्. व्हायला जातोयस्, संन्यास घ्यायला नाही ! '

' पण ही माळ तिथं लागेलच मला ! '

' कशाला ? '

' मृदुला—मृदुला—म्हणून जप करायला !

जायच्या आधल्या रात्री चतुर्थीच्या चांदण्यांत दोघेंहि मृदुलेच्या बंगल्या-च्या गच्चीवर उभीं होतीं. त्या वेळीं मृदुलेला हसवून चारुदत्त शेवटी म्हणाला, ' चक्रवाक पक्ष्यांच्या जोडप्यामध्यें एक कमळाचं पान आलं, की तीं दोघंहि रात्रभर टाहो फोडीत असतात. आता आपल्यामधे निम्मं जग उभं राहाणार आहे; पण आपण बिलकुल रडायचं नाही हं ! निम्मंच काय, सारं जग जरी तुझ्या नी माझ्यामधे येऊन उभं राहिलं, तरी मी तुझाच राहीन आणि तूं— '

पृथ्वीवरली चंद्रकोर कुठं तरी लपली. आकाशांतल्या कोरीनेहि तिचेंच अनुकरण केलें.

× × ×

इंग्लंडला पोचल्यावर चारुदत्ताने मृदुलेला जें पहिलेंच पत्र पाठविलें होतें, त्यांत "कोंकणातून आल्यापासून माझ्या मनावर एक प्रकारची कृष्णच्छाया आली

होती, तिच्यामुळे मी तुझ्याशीं उदासीनपणे वागलों असा तुला भास झाला असेल: त्या कृष्णच्छायेचें कारण पुढेमागे मी तुला लिहीन ' असें लिहिलें होतें. चारुदत्ताच्या मनाला इतकें खळबळून टाकणारें काय असेल याचा मृदुलेने खूप विचार केला; पण त्याला एखादी सुंदर मुलगी तर दिसली नसेल ना, या तर्का-पलीकडे तिची गति केव्हाच गेली नाही. तिचें दुसरें मन उपहासाने म्हणालें, ' सुंदर मुलगी आणि ती कोकणातल्या एका खेडेगावांत दिसणार? कांहीतरीच ! '

या पत्रांत ताजा कलम होताच. त्यांत मृदुलेला वारंवार आपल्या आजी-कडे जाण्याविषयी चारुदत्ताने लिहिलें होतें.

ठरल्याप्रमाणे दर पंधरा दिवसांनी त्याचें पत्र मृदुलेला येई. पण प्रत्येक पत्रांत विषय निराळाच असे! पहिल्यांदा हवा, पाणी, अन्न यांची माहिती आली. मग चालीरीतींचा उल्लेख झाला. एका पत्रांत मृदुलेच्या रूपाची इंग्रज मुलींच्या सौंदर्याशीं तुलना केली होती. पण हे विषय लवकरच मागे पडले. नंतरच्या पत्रांत दोन्हीकडल्या सामाजिक स्थितींची तुलना होऊं लागली. विशेषत: गरिबांविषयी व युरोपांत सर्वत्र पसरत चाललेल्या समाजवादाच्या तत्त्वज्ञानाविषयी त्याच्या पत्रांत फार मजकूर असे.

' अलीकडे तुझीं पत्रं ज्ञानकोशासारखीं वाटतात मला ! ' मृदुलेने त्याला पत्रातून टोमणा मारायला कमी केलें नाही. पण त्याच्या पत्रातला हा सूर कायमच राहिला. आय्. सी. एस्. झाल्यावरचें मनोराज्य त्याच्या पत्रांत कुठेच दिसत नसे. मृदुलेने आपल्या भाचाचें बारसें किती किती थाटानें झालें त्याचें सविस्तर वर्णन त्याला लिहिलें. ' या वेळीं मीं तिकडे असायला हवं होतं, ' अगर ' तुझ्या भाचाच्या बारशादिवशी तुझ्या मैत्रिणींनी तुझी कायकाय थट्टा केली तें तूं पत्रांत लिहिलं नाहीस ! ' अशा अर्थाचें उत्तर चारू पाठवील अशी तिची अपेक्षा होती ! पण त्यानें दोनच वाक्यें लिहिलीं होतीं– ' आपल्या सामाजिक कल्पना किती संकुचित आहेत ! एका श्रीमंत मुलाच्या बारशासाठी जो अवास्तव खर्च होतो, त्यांत दहा गरीब मुलांचा अपमृत्यु टाळतां येईल. पण—'

त्याच्या पत्राबरोबर अनेकदा कात्रणें येत. पण तींहि असल्याच व्याख्या-नांचीं, लेखांचीं. एकदा खलिल गिब्रानची एक कविताच त्याने पत्रासोबत

गाठविली. मृदुलेने गिब्रानचें नांवच ऐकलें नव्हतें. तिला वाटलें-- तें एखादें मधुर प्रेमगीत असेल. पण जसजशी ती कविता ती वाचूं लागली, तसतशी ती कोड्यांत पडली. त्या कवितेचें नाव 'महासागर' असें होतें. आपल्या दोघ्याच्या जीवनावरलें हें सुंदर रूपकच नाही का ?' असे शद्व चारुदत्ताच्या पत्रांत होते, म्हणून मृदुलेला त्या कवितेचा थोडातरी अर्थबोध झाला.

कवि सागरतीरावर स्नान करण्याकरिता जातो; पण त्याला एकान्त तर मिळतच नाही ! उलट ठिकठिकाणी जीं माणसें दिसतात तीं पाहून महासागराकडे जाण्याची त्याच्या मनांत उत्कंठा उत्पन्न होते. (समुद्राच्या तीरावर त्याने पाहिलेल्या माणसांत चिमटीने समुद्रात साखर टाकून तो गोड करूं पाहणारा आशावादी, मेलेल्या माशांना सहृदयतेने परत समुद्रांत सोडणारा भूतदयावादी, लाटांवरला फेस भांड्यांत साठवूं पाहणारा ध्येयवादी, समुद्राकडे पाठ फिरवून आणि कानांपाशीं शिंपला नेऊन 'हा पाहा समुद्र' अशी गर्जना करणारा ध्येयवादी असे कितीतरी तऱ्हेचे विचित्र प्राणी असतात ! त्यांना कंटाळून तो या समुद्रापेक्षा मोठ्या समुद्राकडे जायला हवें असें म्हणतो.)

या कवितेने मृदुलेचें मन अत्यंत अस्वस्थ केलें. चारुदत्ताचीं स्वतःच्या घरीं येणारीं पत्रें तर फारच त्रोटक असत. मधुकर, माधव वगैरेंच्या मित्रमंडळालाहि तो जवळजवळ विसरूनच गेला होता. कांहीतरी घडत आहे, पण तें काय आहे हें मृदुलेला कळेना !

तें कांहीतरी फार भयंकर आहे याची खात्री आय्. सी. एस. चा निकाल वाचतांना तिला झाली. वेड्याप्रमाणे चार चार वेळा तिने सर्व नांवें वाचलीं. त्यांत चारुदत्ताचें नाव नव्हतें. तो आजारीहि नव्हता. मग...?

* * *

ज्या अंकात आय्. सी. एस्. झालेल्या विद्यार्थ्यांचीं नांवें होतीं, तो अंक पुनःपुन्हा चाळून पाहतांना मृदुलेला एक नवाच शोध लागला. तो म्हणजे चारुदत्ताने इंग्रजींत 'मातृभूमि' नांवाचें एक पुस्तक लिहिलें असून त्याची इंग्लंडमध्ये फार वाहवा होत आहे. चारुदत्त आय्. सी. एस्. झाला असता तर या बातमीमुळे ती आनंदाने नाचूं लागली असती. पण आता ती वात। ... ला।

अगदी विषासारखी वाटली. असला भलता उपद्व्याप करण्याऐवज। लावून अभ्यास केला असता तर ?...

चारुदत्त नापास झाला एवढेंच नव्हे, तर पुन्हा आय्. सी. एस्. ला बसण्याची संधि मिळत असूनहि तो तिचा फायदा घ्यायला तयार नाही हें ऐकतांच मृदुलेच्या घरीं एकच गडबड उडाली. सारें घर म्हणूं लागलें—एका साध्या बी. ए. ला आपली मुलगी द्यायची ? त्याचा बाप श्रीमंत आ है खरें—पण मुलगा ? वाङ्निश्चय मोडून टाकलेलाच बरा ! जुन्या काळीसुद्धा वा निश्चय मोडल्याचे दाखले आहेत. बळरामाने सुभद्रा दुर्योधनाला देण्याचें ठरवले ... पण शेवटी तिची माळ अर्जुनाच्याच गळयांत पडला नाही कां ?

भांबावून गेलेल्या मृदुलेने चारुदत्ताला पत्रांत लिहिलें—'तूं इंग्लंडहून एखादी मोठी पदवी घेऊन आला नाहीस तर—' पुढे तिला कांहीच लिहितां येईना. ती अधीरपणाने त्याच्या उत्तराची वाट पाहूं लागली.

* * *

*प्रिय मृदुला,*

*गेलं वर्ष दीड वर्ष नकळत मी तुझी फसवणूक केली याबद्दल क्षमा कर मला.*

*मीं एखादी मोठी पदवी घेऊन यावं असं तुला वाटतं. मृदुला, तुझे आप्तेष्ट तुझं लग्न पदवीशीं, पगाराशीं, प्रतिष्ठेशीं लावणार आहेत; प्रेमाशीं नाही. होय ना ! त्यांना सांग, चारुदत्ताचा मार्ग त्यांच्यापेक्षा आता निराळा झाला आहे.*

*गतवर्षी मी कोकणांत जाईपर्यंत ते व मी एकाच दिशेने जात होतों हें मला मान्य आहे. पण—*

*जन्मापासून मी श्रीमंतींत वाढलों. कधी आगगाडीच्या तिसऱ्या वर्गाच्या डब्यांत बसलों नाही, कधी बाजारातून एखादी वस्तु हातानं आणली नाही, की कधी अमुक हवं म्हटल्यावर तें*

मला मिळालं नाही, असं घडलं नाही. लहानपणापासून आपण बरे, आपले मित्र बरे, आपला खेळ बरा आणि आपला अभ्यास बरा अशा सुखी वातावरणांत मी वाढलों. आंधळ्या मनुष्याला रस्त्यावरले खाचखळगे जेवढे कळतात, तेवढेसुद्धा आयुष्यातले खाचखळगे आम्हां श्रीमंतांच्या मुलांना दिसत नाहीत.

सुखवस्तु वातावरणानं धुंद झालेले माझे डोळे मी इंग्लंडला जाण्यापूर्वी कोकणांत गेलों त्या वेळी प्रथम उघडले. आयुष्यांत क्रांतीचा क्षण एखादाच येतो. तो कुठून येतो तेंहि आपल्याला कळत नाही. माझंहि तसंच झालं.

आजीला बरं वाटावं म्हणून कुलदेवीच्या दर्शनाला मी गेलों. दोनच दिवस त्या खेडेगावांत मी होतों. तिथं पाहिलेलं दैन्य आणि दारिद्र्य यांचं वर्णन केलं तर —तूं माझं पत्र पुढं वाचणारसुद्धा नाहीस.

देवीचं दर्शन घेऊन संध्याकाळी त्या खेडेगावाबाहेर सहज फिरायला म्हणून मी गेलों. जातांजातां रस्त्याच्या कडेला शेतांत एक झोपडी दिसली. तिच्यांत कोणीतरी विव्हळत आहे असं वाटल्यावरून मीं दारांत जाऊन थोडं आंत डोकावलं. एक बाई कण्हत होती. चिंध्यांनी आपलं अंग तिनं कसंबसं झाकलं होतं. जवळच रक्तानं माखलेल्या कांही चिंध्या पडल्या होत्या. त्या बाईसमोर एक लंगोटी लावलेला काळा हाडकुळा इसम उभा होता. हा इसम त्या बाईचा खूनबीन तर करीत नाही ना, अशी शंका माझ्या मनांत आली. पण ती क्षणभरच! दुसऱ्याच क्षणीं त्याच्याकडे प्रेमळपणानं पाहात ती बाई मोठ्या कष्टानं म्हणाली--
'पाणी!'

त्यानं एक भांडं उचललं व तिच्या तोंडांत पाणी घातलं. किती कळकट भांडं होतं तें!

बाई फार आजारी आहे हें मीं ताडलं. मीं हळूच वि॰ लं, ' काय होतंय् बाईला ? '

त्या पुरुषानं आपली दृष्टि माझ्याकडे वळविली. किती भकास दिसत होती ती ! विकटपणाने हसत तो म्हणाला, ' कांहीं नाही. एका संकटातनं तर देवानं सोडवलं ! ' ती बाई पुनःपुन्हा पोटांत कळा आल्याप्रमाणं करीत होती आणि हा गृहस्थ तर संकटातून बचावल्याच्या आनंदांत मग्न होता ! मला कांहींच कळेना !

मीं धिटाईनं म्हटलं, ' कांही औषधपाणी द्या ! '

तो उत्तरला, ' झालंय काय तिला ? नासवलीय् नुसती ! होईल दोन दिवसांत बरी ! '

नासवणं म्हणजे अपुऱ्या दिवसांची बाळंतीण होणं हें आय्. सी. एस्.ला जाणाऱ्या माझ्यासारख्या पांढरपेशाला कसं कळावं ? पण त्या मनुष्यानं लगेच तें स्पष्ट शब्दांत मला सांगितलं.

ती बाई उठून बसली. नवरा तिच्या पाठीवरून हात फिरवूं लागला आणि मग दोघंहि एकमेकांकडे पाहून इतक्या आनंदानं हसलीं, की मला विलक्षण राग आला त्यांचा ! त्या मनुष्याच्याहि लक्षांत तें आलं असावं. माझ्याकडे वळून तो म्हणाला, ' तुम्हांला कळायचं नाही हें दादा ! ही नासवली म्हणून मलाच नाही पण तिला सुद्धा केवढा आनंद झालाय् ! आता काय त्रास झाला तो झाला; पण पोराची तर कटकट नाही पुढं ! आणखी एक पोर म्हणजे आणखी एक खाणारं तोंड ! हवंय् कुणाला तें ? '

तो हसला, ती बाईहि हसली. अकालीं गर्भपात झाल्याबद्दल एखाद्या आईला आनंद होतो हें मला स्वप्नांतसुद्धा खरं वाटलं नसतं! पण स्वप्नं काल्पनिक असतात हेंच खरं!

त्या मनुष्यानं पांचच मिनिटांत आपल्या आयुष्याची कहाणी मला सांगितली. त्या पांच मिनिटांत मी जें शिकलों तें कॉलेजा-तल्या चार वर्षांतच नव्हे, तर कुठल्याहि शाळेंत, कुठल्याहि कॉले-जांत कधीच शिकतां आलं नसतं.

माझ्या वडिलांच्याइतकंच त्याचं वय होतं. पण किती म्हातारा दिसत होता तो! त्याच्या बायकोची बारा बाळंतपणं झालीं होतीं म्हणे! त्यातलीं सात मुलं जिवंत होतीं. नऊ माण-सांचीं पोटं भरतां भरतां या नवराबायकोंच्या नाकीं नव येत! मग प्रत्येक नवं मूल म्हणजे आपल्या गळ्यांत बांधलेला दगड असं त्या जोडप्याला वाटलं तर त्यांत नवल कसलं?

मृदुला, कॉलेजांत असतांना मूल म्हटलं की फूल माझ्या डोळ्यांपुढे उभं राही. रेव्हरंड टिळकांची ती कविता—**आकाशांत फुलें, धरेवर फुलें, माझ्याहि गेहीं फुलें**—ती मला किती आवडत असे हें ठाऊकच आहे तुला. कोकणांत जातांना प्रवासांत माझ्या मनांत जे अनेक रम्य तरंग उठले, त्यातला एक - लिहूं की नको असं वाटतं, पण लिहितोंच- -तुला मूल झाल्यावर आजी आपणां तिघांना कुळदेवीच्या दर्शनाला पाठविल्यावाचून राहणार नाहीं असा होता! आणि मग भविष्याच्या वेलीवर फुलणाऱ्या त्या अज्ञात फुलाचीं चित्रं रेखाटण्यांतच माझं मन कितीतरी वेळ दंग झालं होतं. कधीकाळीं होणाऱ्या मुलाचा माझ्या मनाला आनंद आणि पोटांतल्या पोटांतच मूल मेल्यामुळं त्या जोडप्याला ...लेला

आनंद......त्या शेतकऱ्याची हकीकत ऐकताना माझं डोकं कसं सुन्न झालं.

त्याची सारी हुषारी फुकट होती. त्याला कधींच कसलंच शिक्षण मिळालं नव्हतं. त्याची शारीरिक शक्तीहि फुकट होती. जमीनदाराचा खंड, सावकाराचं व्याज आणि नऊ माणसांचा प्रपंच यांच्या भाराखाली तो अगदी चिरडून गेला होता. माझ्या मनांत आलं माझे वडील गरिबीतूनच पुढं आले होते. त्यांना जी संधि मिळाली ती या मनुष्याला मिळाली असती तर—मिळाली असती तर कां? त्याला मिळायलाच हवी होती. ती मिळाली नाही ही त्याची चूक नाही, समाजाची आहे!

त्या क्षणापासून माझ्या डोक्यांत एक विलक्षण विचारचक्र सुरू झालं. समाजातल्या प्रत्येक दुःखाकडे मी एका विशिष्ट दृष्टीनं पाहूं लागलों आणि इथं आल्यावर मला लवकरच कळून चुकलं, कीं खादी वापरून आणि चहा सोडून देश सुखी करण्याच्या माझ्या शाळेतल्या कल्पना किंबहुना आय्. सी. एस्. होऊन जिल्ह्यातल्या गोरगरिबांचीं दुःखं दूर करण्याच्या माझ्या कॉलेजातल्या कल्पना हें नुसतं मृगजळ आहे. मधुमेह झालेल्या रोग्याला लहानशी जखम झाली तरी ती वाढत जाते ना! सामाजिक दुःखांच्या जखमाहि सर्वत्र तशाच चरत आहेत. हा मलमपट्टीनं बरा होणारा रोग नव्हे.

मला इथं येऊन दोनतीन महिने झाले तोंच एका रशियन बाईची ओळख झाली. आमच्या आजीच्या वयाची आहे ती पण आता इंग्लंडांत येऊन रशियांतील क्रांतीविषयीच्या पुस्तकांचं ती इंग्रजींत भाषांतर करीत आहे. ही बाई मूळची शेतकरीण.

तिसाव्या वर्षापर्यंत तिला अक्षरओळख देखील नव्हती. पण क्रांतीनं मिळालेल्या प्रत्येक संधीचा फायदा तिनं करून घेतला. तिच्याकडे पाहतांना मला आजीची आठवण होऊन अतिशय वाईट वाटे. आजीसारखी लढाऊ वृत्तीची बाई आई म्हणून लाभण्याचं भाग्य माझ्या वडिलांना मिळालं, म्हणूनच ते बडे वकील झाले. लहानपणीच माझी आई वारली. परंतु आजीनं मला आईची उणीव भासूं दिली नाही. पण तिच्या या कर्तृत्वाला घराच्या चार भिंतीपलीकडे कांही आहे, याची जाणीव तरी आहे का? सबंध शिवलीलामृत पाठ म्हणेल, तोंडांत पाण्याचा थेंब न घालतां उपास करील, पंचवीस पाहुणे आले तरी कुणाचं कांही उणं पडूं देणार नाही, माझ्यासारखा नातू आजारी पडला तर नर्सलाहि लाजविण्यासारखी त्याची शुश्रूषा करील; पण तिच्या या साऱ्या गुणाचा समाजाला काय उपयोग?

गिब्रानच्या कवितेचं कात्रण मीं तुझ्याकडे पाठविलं होतं! त्यांत शेवटी कवि म्हणतो, '*Then we left the sea to seek the greater sea.*'

ही महासागर शोधण्याची वृत्ति माझ्यांत बळावली. आय्. सी. एस्. झालों तरी कूपमंडूकाप्रमाणंच माझं आयुष्य जाणार, हें शल्य मनाला पदोपदीं टोचूं लागलं आणि अभ्यासावरलं माझं लक्ष उडालं. माझ्या मनातली ही क्रांती इतरांना कळवायची कशी या कोड्यांत पडून मी गप्प बसलों ही मात्र चूक झाली. वडिलाचं नुकतंच पत्र आलं आहे मला! कुटुंबाचे हजारो रुपये फुकट घालविल्याबद्दल त्यांनी मला दोष दिला आहे. मला ते पैसे निष्कारण खर्च झाले असं वाटतच नाही. जें खरं जग माझ्यापासून वडील

*माणसांनी आणि शिक्षकांनी लपवून ठेवलं होतं, ते शोधून काढण्याकरिता इतका पैसा गेला, हेंच खरं !*

*मृदुला, आपला वाङ्गनिश्चय होण्यापूर्वी माझ्या मनांत हा बदल झाला असता, तर बरं झालं असतं, असं वाटतं. पण आपल्याला हव्यात, तेव्हाच इष्ट गोष्टी घडाव्यात, असा सृष्टीचा संकेत आहे कुठं? लौकिक दृष्ट्या मी आय्. सी. एस्. नापास झालों हें खरं; पण 'मातृभूमि' हें माझं पुस्तक तूं पाहाशील तर त्या परिक्षेपेक्षाहि अधिक उच्च परीक्षा मी पास झालों आहें असं तुला आढळून येईल. तुझ्या नांवानं एक प्रत आजच पाठविली आहे. तें पुस्तक वाच आणि मग मला उत्तर घाल. तुझ्या उत्तराची मी केवढ्या उत्सुकतेनं वाट पाहत आहे म्हणून सांगूं ? तुझा*

**चारुदत्त**

**ता. क.**– *'मातृभूमि' हें पुस्तक तुला अर्पण करण्याकरिता एका मनानं फार धडपड केली. पहिल्या पुस्तकापेक्षा दुसरं अधिक चांगलं होणार आणि मृदुलेला अधिक चांगली वस्तूच अर्पण करायला हवी अशी मीं त्याची समजूत घातली, तेव्हा कुठं आजीला हें पुस्तक अर्पण करायला त्यानं संमति दिली !*

× × ×

प्रत्येक डाकेला मृदुलेच्या उत्तराची चारुदत्ताने मोठ्या उत्कंठेने वाट पाहिली. पण टपालात न पडलेलीं पत्रें कधी कुणाला मिळालीं आहेत का ?

कांही दिवसांनी एका मराठी वृत्तपत्राचा दोन भिकार छायाचित्रें छापलेला एक अंक त्याच्या हातांत पडला. त्या छायाचित्राखालील एवढाच मजकूर चारुदत्ताने वाचला—

**अभिनंदनीय विवाह**

कासंडीचे सुशिक्षित जहागिरदार श्रीमंत अप्पासाहेब व कुमारी मृदुला—

चारुदत्ताचें मन हसतहसत म्हणालें, 'ठीक आहे. महासागराची पहिली लाट तर आली !'

# २

## दुसरें सरकार

लग्न झाल्यापासून कविता वाचायचें मीं सोडून दिलें होतें. पण स्टोव्ह पेटवितां पेटवितां माझें लक्ष खिडकींतून येणाऱ्या सूर्याच्या किरणांकडे गेलें. मी तशीच उठलें आणि खिडकींतून त्या सौम्य, सुंदर प्रकाशाकडे पाहूं लागलें.

आजच्या सूर्यप्रकाशांत कांहीतरी विलक्षण सौंदर्य भरलें आहे असा भास मला झाला. तो प्रकाश पांढराशुभ्र नव्हता; सोनेरी होता! आज मुंबईंत सोन्याचा दिवस उगवला होता.

एक ऑगस्ट !

माझ्यासारख्या हजारो बायकांना हा दिवस लग्नाच्या दिवसापेक्षा—आई होण्याच्या दिवसापेक्षाहि अधिक आनंददायक वाटला असेल. आमच्या अन्नांत रोज माती कालविणारी दारू आज नाहींशी झाली होती. नवऱ्यानें विष प्यावें नी त्याच्या बायकापोरांनी त्या विषाच्या वेदनांनी तळमळत पडावें :
आज संध्याकाळीं दिसणार नव्हता !

मीं वळून खोलींत पाहिलें. आता ऊन चांगलें आंत आलें होतें. मला वाटलें, या भिंतीसुद्धा आनंदाने हसताहेत. घरधन्याचें तें विचित्र धडपडणें, तें बेताल बडबडणें, तें बायकोच्या अंगावर वसकन् येणें, भडाभड ओकणें–सारेंसारें आजपासून बंद होणार म्हणून त्यांना सुद्धा केवढा हर्ष झाला होता!

मीं स्टोव्हकडे पाहिलें. आनंदाच्या भरांत मी पंप करायचें विसरूनच गेलें होतें. काकड्याने स्टोव्ह तापला असला तरी पंप केल्यावांचून तो कसा पेटणार? माझें मलाच हसूं आलें.

स्पिरिटच्या बाटलींत मीं पुन्हा काकडा बुडविला. इतक्यांत मनांत आलें– स्वारी उठली आहे की नाही तें पाहून यावें! काल रात्रीं अकरा वाजतां जेव्हा घरीं परत येणें झालें तेव्हा अगदी बघवत नव्हतें चेहऱ्याकडे! 'हें काय?' म्हणून मीं दुःखाने विचारलें तेव्हा 'शेवटची ओली रात्र!' असे जे अर्धबोबडे शब्द उच्चारणें झालें तें ऐकून माझ्या डोळ्यांचें पाणी कितीतरी वेळ खळलें नाही. अर्धांगवायूचा झटका आलेल्या माणसासारखें तें बोबडें बोलणें–ती विद्रूप मुद्रा–छे.! त्यांच्याप्रमाणे आपलीहि ही शेवटचीच ओली रात्र आहे, यापुढे आपल्यावर रडण्याची पाळी येणार नाही असें जेव्हा एका मनाने दुसऱ्याचें पुनःपुन्हा समाधान केलें तेव्हा कुठे माझा डोळा लागला.

रात्रींच्या अत्याचारामुळे अजूनसुद्धा उठणें झालें नसेल असें मला वाटलें मघाशी मी खोलींत गेलें, कॅलेंडरची ३१ जुलै ही तारीख फाडून टाकली, टेबलावरलें सिगारेटचें भांडें झाडून ठेवलें तेव्हा त्याचा आवाजहि झाला; पण ते या कुशीवरून त्या कुशीवर देखील वळले नव्हते!

मीं दार हळूच लोटून पाहिलें स्वारी अंथरुणावर उठून बसली होती. अगदी टक लावून समोर काय पाहाणें चाललें होतें कुणाला ठाऊक! टेबलामागच्या भिंतीवर कॅलेंडर होतें आणि त्याच्यावर महात्माजींचा फोटो होता. मला वाटलें, गांधींच्या फोटोकडे पाहून स्वारी मनांत पवित्र निश्चय करीत असावी!

दारांतलें मण्यांचें तोरण मीं उगीच हालविलें. त्याच्या मंद किणकिणाटाने त्यांचें लक्ष माझ्याकडे गेलें.

अजूनहि त्यांचे डोळे थोडेसे तारवटलेलेच होते.

समोर बोट दाखवीत ते चिडक्या स्वराने म्हणाले—

‘ हें काय आहे ? ’

‘ गांधींचा फोटो ! ’

‘ माझे डोळे फुटले नाहीत अजून ! ही–ही तारीख–’

मीं वळून पाहिलें.

एक ऑगस्ट ?

त्या तारखेने त्यांना बेचैन केलें होतें. बाहेर एक ऑगस्टचा दिवस उजाडला असला तरी कॅलेंडरमध्ये त्यांना एकतीस जुलैच दिसायला हवी होती !

ते चिडलेले दिसले की मी समोरून निघून जात असें ! आताहि मीं तेंच केलें.

मीं चहा घेऊन आलें तेव्हा स्वारी बरीच निवळली होती. आंघोळीच्या वेळीं तर ते मनमोकळेपणाने हसत होते. हातांतल्या धोतराच्या निऱ्यांकडे पाहात ते म्हणाले—‘ बायकांच्या हातांत कांहीतरी जादू असली पाहिजे. भाकऱ्या असोत, नाहीतर निऱ्या असोत, ज्या ज्या गोष्टीला त्यांचा हात लागतो ती ती सुंदर दिसूं लागते ! ’

त्यांच्या बोलण्याचें मला हसूं आलें. पण लगेच मन उदासहि झालें. ‘ बायकांच्या हातांत जादू असते ’ असें तिकडून म्हणणें झालें ! पण बायकांच्या हातांत जादू असती तर त्यांनी आपल्या नवऱ्यांना दारूच्या मगरमिठींतून कधीच सोडवलें असतें.

त्यांच्या व्यसनाचा सारा इतिहास माझ्या डोळयांपुढे उभा राहिला. मौज म्हणून दोनचारदा ते शर्यती पाहायला गेले. एकदा सहज त्यांनी एका घोड्यावर पैसे लावले. माझ्या दुर्दैवाने तो घोडा पहिला आला.

ते नेमाने शर्यतीला जाऊं लागले.

या नादांत पुष्कळ पैसे गेले तेव्हा कुठे त्यांचे डोळे उघडले. शर्यतीकडे ओढ घेणाऱ्या मनाला ताब्यात ठेवण्याकरिता ते कुठल्याशा क्लबांत जाऊं लागले. गावांत टॉयफॉईडची साथ आली की त्याला कोण बळी पडेल याचा नेम नसतो ना? क्लब.'हि तसेंच घडत असावें! तिथे ते दारूच्या आहारीं गेले. माझीं आंसवें, दोन गोजिरवाण्या पोरांचे केविलवाणे चेहेरे, शुद्धीवर असतांना घेतलेल्या शपथा-संध्याकाळ झाली की दारुबाजाची स्मरणशक्तीच नाहीशी होते हा अनुभव मींहि वर्षानुवर्षे घेतला. पण- पण आता हें सारें एक भयंकर स्वप्न होतें.

माझ्यासारख्या अनेक दुर्दैवी स्त्रियांना सुखी करणारी संध्याकाळ आज येणार होती!

ऑफिसला जातांना तिकडून म्हणणें झालें—

'आज संध्याकाळीं सिनेमाला जाऊं या हं!'

काल रात्रींचा तो भुतासारखा अवतार आणि आताचें हें देवासारखें वागणें! सकाळचा तो चिडखोरपणा आणि आताचा हा गोडवा! कितीतरी वेळ या विचित्र विरोधाचा मी विचार करीत होतें.

दारू!

नदीला पूर आला की तिचें पाणी तांबडेंलाल होऊन जातें. त्या पाण्या-बरोबर साप आणि काटे वाहून येऊं लागतात!

दारूने माणसांतहि असाच बदल होतो!

त्यांचा मूळचा स्वभाव किती चांगला होता! पण—

रोगी बरा होणार अशी खात्री झाल्यावर कुणी रडत बसते का? आज-पासून ते चांगले होणार होते. मग—

त्यांच्या खोलींत येऊन मीं गांधींच्या फोटोला मोठ्या भक्तिभावाने [नमस्]कार केला.

*   *   *

नेहमीपेक्षा कितीतरी आधी ते कचेरींतून परत आले.

'चहाबिहा कांही नको!' ते मोठ्या उल्हासाने उद्गारले. सिनेमाला जायला एखाद्या लहान मुलाइतके ते उत्सुक झाले होते.

पण चहाचा प्रश्न नसला तरी स्वयंपाकाचा होताच की! रात्रींच्या जागरणामुळे दुपारीं अंग कसें अगदी जड झालें. घटकाभर विसावा घ्यावा म्हणून जी लवंडलें ती चार वाजतां उठलें मी! त्यामुळे संध्याकाळची भाजीसुद्धा चिरून झाली नव्हती अजून! पण त्यांना हें कसें सांगायचें?

मीं म्हटलें, 'आज जरा बरं वाटत नाही मला! उद्या जाऊं की! सिनेमा कांही पळून जात नाही कुठं!'

माझें शेवटचें वाक्य ऐकून ते हसले. पण त्या हसण्यामागे किती कारुण्य लपलें होतें! दारांत आलेल्या भिकाऱ्याची आपण कांहीतरी थट्टा केली की तोसुद्धा तोंडावर कृत्रिम हसूं आणतो! माझ्या समाधानासाठी तेहि तसेच हसले असावेत! 'सिनेमा नाही कुठं पळून जाणार! पण मी?' असा कांहीतरी प्रश्नच जणू कांही त्यांचें तें हसणें मला विचारीत होतें.

ते खोलींत गेले. मी हळूच मागून जाऊन पाहिलें. स्वारी एक पुस्तक घेऊन आरामखुर्चीत पडली होती.

मला हायसें वाटलें. मुलें खेळून परत येईपर्यंत स्वयंपाक तयार व्हावा म्हणून मी झटपट काम करूं लागलें.

दोन घटकांनी एक मैत्रीण भेटायला आली. तिला चहा करून देण्याकरितां मी स्टोव्ह खाली काढला. स्पिरिटची बाटली स्टोव्हजवळ ठेवण्याची माझी नेहमीची पद्धत असे. पण बाटली तर तिथे दिसेना. डाव्याउजव्या हाताने कुठेतरी ती ठेवली असेल म्हणून मीं सारें स्वयंपाकघर धुंडाळलें. पण बाटली कुठेच सापडेना!

एकदम एक विचित्र शंका माझ्या मनांत आली.

मी त्यांच्या खोलीकडे गेलें. दारांतूनच ती बाटली ओळखली मी.

बाटली त्यांच्या आरामखुर्चीजवळ आडवी पडली होती. मघाचें पुस्तक त्यांनी दूर भिरकावून दिलें असावें. वाऱ्यामुळे उडणाऱ्या त्याच्या पानांची फड-फड किती भयंकर वाटत होती !

मला एक हुंदका आला. त्यांना आपलें मन मुळीसुद्धा आवरतां येऊं नये याचें विलक्षण दुःख झालें मला.

पण तो हुंदका मीं आंतल्या आंत गिळला. गांधींच्या फोटोकडे माझी नजर गेली. गांधींच्या पुण्याईनें दारूबंदी झाली. आता तिकडलें व्यसन हां हां म्हणतां सुटेल या कल्पनेनें माझें मन स्थिर झालें. महात्माजींच्या फोटोकडे आदरानें पाहत मी स्वयंपाकघरांत परत आलें.

* * *

दुसरे दिवशीं संध्याकाळीं आम्ही सिनेमाला गेलों.

चित्र सुरू झाल्यावर मीं त्यांच्याकडे पाहिलें. त्यांचें लक्ष चित्राकडे मुळीच नव्हतें.

मध्येच त्यांनी माझा हात आपल्या हातांत घेतला, तो उचलला नि आपल्या ओठांना लावला. आमच्यासमोर राहाणारी एक जहांबाज बाई आमच्या मागेच सिनेमा पाहायला बसली होती. ती उद्या ही गोष्ट साऱ्या चाळीला सांगितल्याशिवाय राहाणार नाही याची मला खात्री होती.

मीं हळूच त्यांच्या हातांतून आपला हात काढून घेतला.

ते आपल्या खुर्चीत एकसारखी चुळबुळ करीत होते. सिनेमाच्या पायीं आज आपण उगीच पैसे घालविले असें मला वाटलें.

विश्रांतीच्या वेळीं त्या मागे बसलेल्या बाईनें बोलावल्यामुळे मला तिच्या-पाशीं जाऊन बसावें लागलें.

चित्र पुन्हा सुरू झालें. ते काय करताहेत हें मी मुद्दाम पाहात होतें. दोनतीन मिनिटांनी ते जे बाहेर उठून गेले ते चित्र संपेपर्यंत आंत आलेच नाहीत !

घरीं जातांना मीं म्हटलें—

'चित्राला बसायचं नव्हतं तर पैसे कशाला खर्च केले उगीच ?'

त्यांनी विचित्र दृष्टीने माझ्याकडे पाहिलें. तिच्यांत कसली तरी अतृप्त भूक होती.

*  *  *

पुढचे दोन दिवसहि असेच गेले. एक दिवस मुलाचें ७. । तापलें.

दुसरे दिवशीं कुणी मैत्रिणी बसायला आल्या.

शनिवारीं संध्याकाळीं ऑफिसांतून येतांच ते म्हणाले–

‘ मला पुण्याला जायला हवंय् आता ! ’

‘ कां ? ’

‘ माझा एक स्नेही फार आजारी आहे ! ’

‘ कोण ? ’

‘ तो देशपांडे ! ’

‘ देशपांडे ? ’ मीं अद्यापपर्यंत त्यांच्या पुण्याच्या स्नेह्यांत हें नांव कधींच ऐकलें नव्हतें.

‘ तारबीर आली होती की काय ? ’

‘ हुं ! ’

ते न्हाणीघरांत गेले तेव्हा त्यांच्या कोटाचे सारे खिसे चाचपून पाहिले. पण तार कुठंच दिसली नाही.

‘ सोमवारीं सकाळीं येईन मी ! ’ असें सांगतांना माझ्या नजरेला नजर देण्याचा त्यांना कांहीं धीर झाला नाही. ते पुण्याला कशाला जात आहेत हें माझ्या ध्यानांत आलें. वाटलें, त्यांच्या पायांना घट्ट मिठी मारावी नी म्हणावें– “ प्राण गेला तरी मी तुम्हाला जाऊं देणार नाही. ”

पण जें जें मनांत येतें तें तें करण्याची शक्ति मनुष्याला असती तर—

तर ? तर पृथ्वीचा स्वर्ग झाला असता का ?

ते जिना उतरून गेल्यावर कितीतरी वेळ मी एखाद्या दगडी पुतळ्याप्रमाणे स्तब्ध उभी होतें.

त्यांच्या रिकाम्या खोलीकडे दारांतून असहायपणें पाहतांना माझ्या गांधीन्या फोटोकडे गेली.

ते त्या चार दिवसांत त्या फोटोकडे पाहून माझें मन भक्तीने उचंबळून येत असे.

पण आता मात्र भक्तीची जागा निराशेने घेतली. गांधी झाले तरी काय करणार? कुणाची ललाटरेषा कांही त्यांना बदलतां येत नाही! काँग्रेसचें राज्य झालें, दारूबंदी झाली! पण ज्याचा भोग त्यानेच भोगला पाहिजे! नाही का?

* * *

रविवारचा सारा दिवस मीं कसा घालविला तें माझें मला माहीत. अपरात्रीं एखादें भयंकर स्वप्न पडून झोप उडाली म्हणजे माणसाला एकएक मिनिट तासासारखें वाटूं लागतें!

माझीहि स्थिति तशीच झाली होती.

दुपारीं जेवणें झाल्यावर कांहीतरी वाचावें म्हणून मी एका मासिकाचा अंक उघडून बसलें. पण त्यांतल्या पहिल्या गोष्टीकडे लक्ष जातांच माझें मन वाचण्यावरून उडालें. त्या गोष्टीचें नांव होतें—'सुखाचा संसार.'

हातांत अंक घेऊन विचार करतांकरतां माझ्या डोळयांत पाणी उभें राहिलें असावें! धाकटी मिनू पाणी प्यायला स्वयंपाकघरांत गेली होती. परत जातांना माझ्याकडे पाहून ती धावतच जवळ आली आणि गळयांत हात टाकून म्हणाली–'काय झालं ग आई तुला?'

मला काय झालें होतें तें त्या बाळजीवाला कसें सांगायचें? या जगांत दुःखाची वाटणीसुद्धा कायद्याच्या नियमांनीच होते. मनुष्य सज्ञान असला तरच त्याला दुसऱ्याच्या दुःखांत भागीदार होतां येतें!

कांहीतरी बोलायचें म्हणून मी मिनूला म्हणालें, 'डॉक्टराकडून डोळे तपासून घ्यायला हवेत ग! असं सारखं पाणी येतं!'

मिनू माझ्या डोळयांतलें पाणी आपल्या फ्रॉकने पुसून नाचत निघून गेली पण खोटें बोलणाऱ्या माझ्या मनाला मात्र तसें नाचतां येईना. तें खिन्नपणाने

‘ गांधी नी कॉंग्रेस यांच्यासारख्या मोठमोठ्या डॉक्टरांनासुद्धा तुझे डोळे बरे करतां येत नाहीत तिथे—’

रस्त्यावरून कुणीतरी भिकारीण एक अभंग गात चालली होती.

मी खिडकीपाशी जाऊन उभी राहिलें. अभंगाचे शब्द ऐकूं येऊं लागले—

‘ तुझें आहे तुजपाशी
परी तूं जागा चुकलासी । ’

माझ्या मनांत आलें—साधुसंतसुद्धा मोठे लबाड आहेत. या जगांत सुख मिळत नाही असें कधी सरळ सांगत नाहीत ते. इथे सापडलें नाही तर तिथे शोधा असा फुकाचा उपदेश करायला त्यांचें काय जातें ?

*　　　*　　　*

सोमवारीं सकाळीं स्वारी परत आली तेव्हा शुद्धींत होती. पण चेहऱ्यावर आदल्या दिवशींच्या बेतालपणाच्या खुणा पुरेपूर दिसत होत्या. चुलीवर ठेवलेल्या भांड्यांत शीत नसलें तरी त्याचा जळकेपणा कांही कुठे लपत नाही ! त्यांच्या ओढलेल्या डोळ्यांकडे आणि सुस्त चेहऱ्याकडे पाहून कुणींहि सांगितलें असतें की—

दुसरें कुणी सांगायला कशाला हवें होतें ? आजचीं वर्तमानपत्रेंच नाना तऱ्हांच्या बातम्या ओरडून सांगत होतीं—‘ शनिवारीं नी रविवारीं कितीतरी दारूबाज कल्याणला गेले होते ! ’ ‘ अनेक सभ्य माणसांचीं या रविवारीं कल्याणला आणि पुण्याला कामें निघालीं होतीं ! ’

‘ ठाण्याच्या खाडीवर एका मोटारीच्या झडतींत दारूची एक बाटली मिळाली. ड्रायव्हरने ती खाडींत फेकून देण्याचा प्रयत्न केला; पण तो साधला नाही, सदरहू ड्रायव्हर अटकेंत आहे ! ’

एक अन् दोन ! दररोज अशा बातम्या ऐकूं येऊं लागल्या. माझें मन कसें सुन्न होऊन गेलें.

संध्याकाळीं घरीं परत आल्यावर स्वारी वसकन् अंगावर काय येई, चांगलें खायला करून दिलें तरी चार घास खाऊन बाकीचें टाकून काय देई, आपल्याच

खोलींत आदळआपट काय करी ! एकएकदा मनांत येई-नवऱ्याची दारू सुटो नाहीतर न सुटो, त्याच्या बायकोच्या नशिबीं सुख नसतें हेंच खरें !

ग शनिवार आला. पुन्हा त्यांचें पुण्याला काम निघालें.

वारीं स्वारी आली ती मागच्यापेक्षाहि अधिक वाईट स्थितींत !

पुढच्या शनिवारची मला धाकधूक वाटूं लागली. पण भिऊन जगांत कुठलें संकट टळलें आहे ?

शनिवारवर नजर लावून ते आठवड्यांतले बाकीचे दिवस कसेबसे ढकलत आहेत हें माझ्या लक्षांत आलें. कॅलेंडरमध्ये शुक्रवारींच त्यांनी शनिवारची तारीख लावून ठेवली होती.

* * *

तिसऱ्या सोमवारीं स्वारी आली तेव्हा मला अगदी राहावेना !

मीं रागाने म्हटलें, ' काय चाललंय् हें ? '

' कुठं काय चाललंय् ? '

' सरकारनं दारूबंदी केली आहे ना ? '

' केली असेल ! मला काय त्याचं ? या घरांत माझं राज्य आहे ! काँग्रेस सरकारचं नाही ! '

' तुमचं एकट्याचंच राज्य नाही इथं ! इथं माझंहि राज्य आहे-मुलांचं सुद्धा आहे ! '

ते अगदी बेफाम झाले होते. ' तोंड बघा राज्य करणाराचं ' असें बोलून त्यांनी जें विकट हास्य केलें—

माझा संताप अनावर झाला. मीं त्यांच्यापुढे जाऊन म्हटलें, ' बघा ना ! नीट डोळे उघडून बघा ! '

चिडून त्यांनी फाड्कन माझ्या तोंडांत मारली.

त्या क्षणीं माझें मन उसळून म्हणालें, ' तुलाहि याची परतफेड करतां येईल ! '

माझा हात वर झाला. पण तो त्याची धुंदी उतरविण्याकरिता नाही, तर स्वतःचा गाल चोळण्याकरिता !

सारी दुपार मीं रडून घालविली. मग मनाशीं निश्चय [illegible] असा अपमान करून घेऊन घरांत राहाण्यांत काय अर्थ आहे ? बायको [illegible] नवऱ्याला तिची किंमत कळत नाही हेंच खरें ! मुलाला चुलतबहिणी[illegible] ठेवावें नी मिनूला बरोबर घेऊन कोकणांत आतेकडे जावें !

* * *

वैतागाच्या भरांत मी कोकणांत गेलें खरी; पण तिथे जाऊन माझ्या मनाचा कोंडमारा कांही कमी झाला नाही. मी एकदम कां आलें हें कुणाला सांगण्याची सुद्धा चोरी होती ! आतेपाशीं अर्धवट बोललें तेव्हा तिने मलाच मूर्खांत काढलें. ती म्हणाली–' घोड्याला लगाम नसला तर तें अधिकच चेकाळतं हं ! '

सृष्टीने ठिकठिकाणचें हवामान निरनिराळें ठेवलें आहे याचा या वेळीं किती आनंद वाटला मला. त्यामुळे कुणींहि विचारलें, की चार दिवस हवा पालटायला आलें आहे म्हणून सांगायची माझी मोठी सोय झाली. नाहीतर–

माणसाच्या मनाला लागलेली काळजी जगाला कधीच दिसत नाही. पण आंतून पोखरून निघाल्यामुळे त्या मनाची शक्ति किती कमी होते हें त्याचें त्यालाच ठाऊक !

घराबाहेर जावें अथवा घरांत कुणाशीं बोलावें अशी इच्छाच होईना मला. तापकऱ्याची अन्नावरली वांछाच उडून जाते ना ? मुंबईहून येऊन तीन दिवस झाले तरी माझ्या मनाची तीच अवस्था कायम होती !

शुक्रवारीं पहाटे तर तीन वाजतांच माझी झोप नाहीशी झाली. नाही नाही ते विचार मनांत येऊं लागले–उद्या शनिवार. आपण कांही मुंबईत नाही. स्वारी जास्तीच बेताल होईल. ' घरचं राज्य माझंहि आहे ! ' असें अभिमानाने त्या दिवशीं मीं त्यांना उत्तर दिलें होतें. पण आपलें राज्य सोडून जाणारी राणी त्याचें रक्षण कसें करणार ?

छेः ! आपण मुंबईत राहायला हवें होतें !

पण मुंबईंत राहून दर आठवड्याला शनिवारपासून सोमवारपर्यंत जळत बसण्याऱ्यालीकडे मी काय करणार होतें ?

क्षणभर माझा डोळा लागला. पण लगेच बायाच्या हाकेने मी लहानपणापासून ही हाक माझ्या ओळखीची होती ! बाया ही आतेची एक वर्षाची दुधवाली होती. लहानपणीं मी आतेच्या घरीं सहासहा महिने राहायला येई, तेव्हा बाया संध्याकाळीं आपल्या घरीं मला घेऊन जाई आणि फेसाने भरलेलें उनउनीत दूध मला प्यायला देई. स्वतःला तीनचार मुलें असूनसुद्धा तिला माझा फार लळा होता.

बायाच्या त्या फेसाळ दुधाच्या स्मृतीने माझें मन आनंदून गेलें. पण लगेच—

लगेच बायाचा तो दारूबाज नवरा परसू माझ्या डोळ्यांपुढे उभा राहिला. एके दिवशीं संध्याकाळीं बाया मला दूध देत असतांना तो झिंगत आला नी तिच्या हातांतलें दुधाने भरलेलें भांडें त्याने दूर भिरकावून दिलें. त्या वेळचे त्याचे शब्द मला आठवले-' या पोरीला फुकट दूध देतेस नी मला मात्र दारूला पैसे नाहीत ! '

या दुसऱ्या आठवणीने माझ्या मनाचा क्षणभर थरकाप झाला. वाटलें— स्त्रीचा जन्म दुःखाकरिताच आहे ! घर हें नवऱ्याच्या दृष्टीने राज्य असेल. पण बायकोच्या दृष्टीने तो तुरुंगच असतो एक ! राजाने कसें वागावें हें ठरविण्याचा अधिकार जसा तुरुंगांतल्या कैद्याला असत नाही--

येऊन किती दिवस झाले तरी मी बायाला भेटलें नव्हतें. माझी मलाच लाज वाटली. अंथरुणावरून झट्‌कन् उठून मी धांवतच सोप्यावर गेलें.

बायाने प्रथम माझ्याकडे टक लावून पाहिलें. मग ती स्वतःशींच हसली. तिच्या त्या हसण्यांतून वात्सल्य अगदी ओसंडून जात होते. ' माझ्या घरीं दूध प्यायला केव्हा येणार बाई ! ' तिने प्रश्न केला. क्षणभर माझें बाळ-पण परत आल्यासारखें वाटलें मला ! ' आज नाहीतर उद्या तुझ्याकडे येतें ! ' असें मीं कबूल केलें तेव्हा कुठे दुधाचें भांडें उचलून ती चालूं लागली.

बाया दृष्टीआड झाली. पण कितीतरी वेळ माझें मन तिचाच विचार करीत होते. चाळिशी उलटून गेलेल्या बायाच्या मुद्रेवर जो आनंद होता तो ऐन पंचविशींत माझ्या वाट्याला कां येऊं नये? गरिबी, मुलाबाळांच्या [illegible], कष्टाचीं कामें—या सर्वांतहि मनुष्य सुखी राहूं शकेल, पण दारूबाज न[illegible]ऱ्या संसारांत स्त्रीला सुख कुठून मिळणार?

पण बाया तर आनंदी दिसत होती. परसूची दारू सुटल[illegible]टली असेल काय?

माझें मलाच हसूं आलें. चांगल्या शिकल्यासवरलेल्या माणसांची दारू सुटणें किती कठीण आहे हें मी डोळ्यांनी पाहात होतें. अशा स्थितींत परसू-सारख्या खेडवळाची दारू सुटली असेल अशी कल्पना करण्यांत काय अर्थ होता?

* * *

परसूविषयीच्या या कुतूहलामुळे असो अथवा आपलें दुःख बायापाशीं सांगितलें तर तें थोडेंतरी हलकें होईल या कल्पनेमुळे असो, आठ वाजतां मी बायाच्या घराकडे जायला निघालें.

वाटेंतच मला परसू भेटला. कुणातरी उतारूची ट्रंक तो डोक्यावरून घेऊन जात होता. 'तुझ्याच घरीं चालतेय्!' असें मीं सांगतांच तो मनापासून हसला.

तो किंचित् पुढे गेला. मी त्याच्याकडे पाहातच होतें. त्याच्या उघड्या पाठीवर एकदम दोनतीन वळ मला दिसले. लहानपणीं मीं परसूला पुष्कळ वेळां उघडा पाहिला होता. पण त्याच्या पाठीवर असले वळ पाहिल्याचें कांही मला आठवेना.

मी लगबगीने त्याच्यामागून गेलें. मला पाहातांच तो थांबला. मीं म्हटलें, 'परसू, तुझ्या पाठीवर हे वळ कुठून आले रे?'

तो नुसता हसला.

मी अधिकच गोंधळलें. माझ्या मुद्रेकडे पाहून तो म्हणाला, 'सरकारी बक्षीस आहे हें ताई!'

आता माझ्या ध्यानांत आलें–मिठाच्या कायदेभंगाच्या वेळीं या गावांतलीं खूप माणसें तुरुंगांत गेलीं होतीं. परसूहि त्यांत असला पाहिजे. तुरुंगांत कु[illegible]ारी निमित्तानें त्यानें फटके खाल्ले असतील! हे वळ त्या फटक्यांचेच आ[illegible]! ‘ सरकारी बक्षीस ’ असें तो म्हणाला तें कांही उगीच नाही.

*　　　*　　　*

मी बायाच्या घरीं आलें तेव्हा ती गुडगुडी साफ करीत बसली होती! गुडगुडीचें काम संपल्यावर तिनें बाहेर खोबरेल तेलाची वाटी आणून ठेवली, कांबळयावर बसलेल्या मांजराला दूर ठेवून तें झटकलें नी तें जमिनीवर नीट घातलें.

मीं थट्टेने म्हटलें–

‘ कुणी मोठा पाहुणाबिहुणा येणार आहे वाटतं आज ? ’

‘ हं ! ’

‘ कोण ? ’

‘ परसू ! ’

मी हसूं लागलें. माझ्याबरोबर तीहि हसूं लागली.

पण तिनें मुंबईच्या गोष्टी काढतांच माझें हसूं मावळलें. तीहि गंभीर होऊन ऐकूं लागली.

‘ सरकारनं मुंबईत दारू बंद केलीय् ! पण आमच्या घरांत कांही ती बंद होत नाही ! ’ मी सुस्कारा टाकून उद्गारलें.

माझ्या पाठीवरून मायेने हात फिरवीत ती म्हणाली, ‘ एका सरकारचं हें काम नाही पोरी ! ’

ती काय म्हणत आहे हेंच मला कळेना !

‘ बाहेरच्या मोठ्या सरकारला दुसऱ्या सरकारनं मदत करायला हवी ! ’

‘ दुसरं सरकार ? कुठलं दुसरं सरकार ? ’

' तुझ्या घरांत तूं सरकार आहेस ! माझ्या घरांत मी आहे ! घर बायका चालवितात बाई; पुरुष नाहीत ! मला सुद्धा अगदी वाईट प्रसंग आला तेव्हा हें उमजलं ! '

तिने आपली सारी कुळकथा मला सांगितली–परसूची तिच्य' मुलांवर खूप माया होती. पण दारू प्याला म्हणजे तो काय करील अ. ण काय नाही याचा नेम नसे. बाया त्याला भिऊन अगदी नमून वागे. पण ्याचें व्यसन कमी होण्याऐवजी वाढतच गेलें.

कांहीतरी कारणावरून परसूचें शेजाऱ्याशीं वाकडें आलें. दारूच्या धुंदींत त्या शेजाऱ्याचें रांगतें मूल उचलून विहिरींत टाकायला तो निघाला. कांही केल्या तो कुणाला आवरेना ! तें पाहून बायाला ब्रम्हांड आठवलें. एका बाळ-जीवाची हत्त्या ! तिरिमिरींने अंगणांत पडलेला परसूचा बैलांचा चाबूक तिने उचलला आणि त्याच्यामागे धांवत जाऊन त्याच्या पाठीवर तिने सपासप कोरडे उडविले. त्या माराने तो शुद्धीवर आला. मूल खाली ठेवून तो मटकन् बसला.

त्या दिवशीं बायाला कळून चुकलें, की बायको गायीसारखी वागली म्हणून कांही नवऱ्याची दारू सुटत नाही. तिने प्रसंगीं वाघीणहि व्हायला हवें ! सरकार नाही का गुन्हेगारांना शिक्षा करीत ?

व्यसन सुटावें म्हणून नवऱ्याशीं कठोरपणाने वागावें लागलें तरी त्याची भरपाई त्याच्या लहानसहान लहरी संभाळून, त्याला एरवीं जेवढें सुख देतां येईल तेवढें अगत्याने देऊन, बायकोला सहज करतां येते.

बायाचें बोलणें संपतां संपतां परसू आला. स्वच्छ कांबळयाकडे नजर जातांच त्याला बरें वाटलेंसें दिसलें. इतक्यांत बाया आंतून निखारे घेऊन आली.

गुडगुडीचे झुरके घेतांना परसूच्या चेहऱ्यावर आनंदाच्या अनंत छटा चमकत होत्या.

* * *

बायाकडून परत येतांच मी घाईघाईने मुंबईला जायची तयारी करूं लागलें हें पाहून आतेला आश्चर्य वाटलें. ' आलीस तशी चार दिवस राहा ना ! ' असा आग्रह ती मला करूं लागली.

माझी बांधाबांध चालूच आहे असें पाहून ती म्हणाली, 'एवढी काय तारीख लागलीय् तुझी मुंबईला.'

" नीचे कपडे ट्रंकेंत भरीत मीं म्हटलें,

'ᴗ ग कल्पना नाही, आते. उद्या संध्याकाळीं त्यां-। घेऊन सिनेमाला जायचं ! नी दररोज संध्याकाळीं त्यांच्याबरोबर दोन तास फिरायला जाणार आहे मी ! खाणावळींत एक वेळचा डबा आणविला म्हणजे झालं. अगदी नुसतं लग्न झालेल्या मुलीसारखी त्यांच्याभोंवती नाचत राहाणार आहे मी ! फिरायला जातांना गजरा घेऊन तो वेणींत घालणार, मधेच त्यांना त्याचा वास देणार, त्यांतलं एक फूल काढून त्यांच्या कोटाला लावणार–'

'इश्श !' आत्या उद्गारली.

वडील माणसें ज्या गोष्टीची 'इश्श' म्हणून संभावना करतात तीच तरुण माणसांना फार आवडते, नाही का ? यामुळे हा आतेचा उद्गार मला शुभ शकुनासारखा वाटला.

मिनीचा पापा घेत मीं तिला म्हटलें—

'तुला सुद्धा दररोज काम आहे हं मुंबईला !'

'कसलं ?'

'ते कचेरींतून आले, की धावत जाऊन त्यांना मिठी मारायची, पापे द्यायचे, त्यांच्याशीं खेळायचं—'

मिनी मोठ्याने हसली.

पोरटीचें हसणें हुबेहूब त्यांच्यासारखें असल्यामुळे स्वारीच हसत आहे असा मला भास झाला.

# ३

## देव आणि पायऱ्या—

किती उंचावर देऊळ होतें तें !

उंचीच्या प्रमाणांत देवाची लोकप्रियता असते कीं काय कुणाला ठाऊक !

त्या देवाच्या दर्शनाला दूरदूरचे हजारो लोक येऊं लागले.

प्रत्येक पायरीला वंदन करीत सारा भक्तगण वर जात असे.

या नमस्कारांमुळे पायऱ्यांना वाटूं लागलें—वर देवळांत बसलेल्या देवापेक्षा आपलीच योग्यता अधिक आहे ! आपण नसतों तर या भक्तांना देवाचें दर्शन दुर्लभ झालें असतें !

भक्तांनीं देवाकरितां आणलेलीं फुलें आपल्यालाच वाहिलीं पाहिजेत असा साऱ्या पायऱ्यानीं हट्ट धरला.

एक पायरी म्हणाली, 'आम्हीं आहोंत म्हणून या देवाचं इतकं स्तोम माजलं आहे. नाहीतर इतक्या उंचावर त्याचं तोंड पाहायला धडपडत कोण जाणार होतं ?'

दुसरी पायरी उद्गारली, ' तसं पाहिलं तर देवांत नि आमच्यांत का आहे ? त्याच्या मूर्तीचा दगड संगमरवरी आहे, आम्हीं काळ्या दगडाच्या पण काळ-गोरा हा भेद आतां नाहीसाच झाला पाहिजे ! '

पायऱ्यांची ही तर्कसुद्ध विचारसरणी ऐकून सर्व भक्त हंसत हंसत मात्र त्यांच्यांपैकी एकानेही पायऱ्यांना आपलीं फुलें वाहिलीं नाहीत.

पायऱ्या रागावल्या, जळफळूं लागल्या, संतापाच्या भरांत स्वतःचे तुकडे तुकडे करून घेतले त्यांनी !

देवदर्शनाकरितां येणाऱ्या भक्तांना वाटेंत आडव्या तिडव्या पसरलेल्या दगडांच्या ठेंचा लागूं लागल्या, कित्येकांच्या पायांतून रक्त येऊं लागलें.

सर्व भक्तांनी ठरविलें—या पायऱ्या फार जुन्या होऊन गेल्या आहेत. त्यांचा भक्तांना फार उपद्रव होत आहे. हे सारे फुटके तुटके दगड वाटेंतून काढून टाकून नव्या पायऱ्या बांधणेंच बरें होईल.

पायऱ्यांचे फुटके दगड एका बाजूला जाऊन पडले, नव्या सुंदर पायऱ्या बांधण्यात आल्या.

सकाळ संध्याकाळ देवाची नौबत कानांवर पडली कीं या फुटक्या दगडांचा तुकडान् तुकडा तडफडूं लागतो !

आणि याचवेळीं देवदर्शनाला जाणारे भक्त नव्या पायऱ्यांकडे कौतुकानें पाहात वर जातात !

# ४

## पिंजऱ्याबाहेर—

' मालती फार आजारी आहे. तत्काळ निघा.

—बाबासाहेब कामत. '

छेः ! मला क्षणभर वाटलें, आपल्याला एखादें स्वप्न पडत आहे.

पण माझ्या डोळ्यांपुढे तारेचा पिवळा लिफाफा पडला होता. माझ्या हातांत तारेचा अगदी फिक्कट अशा गुलाबी रंगाचा कागद होता.

मनांत विचार आला– पोस्टखातें तारांना असल्याच रंगाचा कागद कां वापरतें ? कागदाच्या या फिक्कटपणाशीं कारुण्याचा कांही संबंध आहे का ? तारखात्यावर चांगल्या बातम्यांपेक्षा वाईट बातम्या पोचवण्याचेच प्रसंग अधिक येत असावेत ! त्यामुळे—

पण मालती आजारी आहे म्हणून बाबासाहेबांनी मला कां तार करावी ? कलकत्त्यांत काय डॉक्टरांना तोटा आहे ? आणि बाबासाहेबांनी तार केली म्हणून मिळेल ती गाडी पकडून मीं लगेच कलकत्त्याला जावें असे त्यांनी माझ्यावर

काय उपकार केले होते? एम्. बी. बी. एस्. झाल्यावर मालतीशीं पुनर्विवाह करण्याची इच्छा मीं प्रदर्शित केली आणि या म्हाताऱ्याने—

दहा वर्षांपूर्वीचा तो विलक्षण प्रसंग माझ्या डोळ्यांपुढे उभा राहिला. मनाच्या जखमा आंतून नेहमी ओल्या असतात हेंच खरें! या दहा वर्षांत परदेशांत जाऊन मानसशास्त्राच्या दृष्टीने रोगचिकित्सा कशी करायची हें मी शिकून आलों. प्रॅक्टिसला सुरवात केली न केली तोंच माझी यशस्वी डॉक्टरांत गणना होऊं लागली. मालतीपेक्षाहि सुंदर अशी मुलगी माझी पत्नी झाली. लग्नानंतर कांही दिवस निद्रित पत्नीच्या मुखाकडे पाहातांपाहातां मला मालतीची आठवण होई; पण लवकरच मालतीच्या आकृतीच्या माझ्या मनांतल्या रेषा अंधुक होऊं लागल्या आणि पुढे मुलें होऊन घराला गोकुळाचें स्वरूप प्राप्त झाल्यावर तर मालती हें माझ्या जीवनांतलें एक क्षणिक स्वप्न होतें असेंच मला वाटूं लागलें.

पण बाबासाहेबांच्या तारेने या स्वप्नांतल्या कितीतरी गोष्टी मला आठवूं लागल्या. मात्र गुलाबांच्या पाकळ्या झडून जाऊन त्यांचे काटे मागे राहावेत तशी यौवनस्वप्नांतल्या त्या स्मृतींची स्थिति झाली होती!

मालतीची आणि माझी पहिली भेट झाली त्यावेळीं आम्ही एकमेकांकडे कसें लाजून पाहात होतों हें आता कांही केल्या मला आठवेना!

पण माझ्या मागणीला नकार देतांना बाबासाहेबांनी दिलेलें तें व्याख्यान— त्यांतला शब्द नी शब्द माझ्या कानांत घुमूं लागला.

'मालतीला समाजाची सेवा करायचीय्. लग्न करून मुलं संभाळत बसणाऱ्या पुष्कळ बायका देशांत आहेत! आज देशाला कशाची जरुरी असेल तर ती लग्न न करणाऱ्या स्त्रियांची!'

बाबासाहेबांच्यापुढे ब्र काढण्याची छाती नसल्यामुळे मालती मुखस्थंभासारखी बसली होती. मलाहि काय बोलावें हें सुचेना. पण माझ्या तोंडांतून विरोधाचे चारदोन शब्द बाहेर पडतांच बाबासाहेब उसळून उद्गारले, 'तुमचं

तरुण लोकांचं सारं तत्त्वज्ञान मला माहीत आहे. तुम्हाला लग्नावांचून दुसरं काय सुचतंय् ?'

मालती अवघी वर्षाची असतांना तिची आई वारली होती. तिचा थोरला भाऊ पांच वर्षांचा होता तेव्हा! आपल्या दोन्ही मुलांना सावत्रपणाचा जाच होऊं नये म्हणून बाबासाहेबांनी पुन्हा लग्न केलें नाही. त्यांचें चरित्र धुतल्या तांदुळासारखें आहे हें त्यांच्या शत्रूंनी सुद्धा कबूल केलें असतें. त्यामुळे त्यांच्याशीं बोलतांना मनाला एक प्रकारचें भयच वाटे. त्या वेळीं मी निरुत्तर झालों, त्याचें कारणही हेंच होतें.

बाबासाहेब मालतीकडे अभिमानाने पाहून मला म्हणाले होते, 'मालती माझी मुलगी आहे हें लक्षांत ठेवा!'

अश्रुपूर्ण दृष्टीने मालतीचा शेवटचा निरोप घेतांना एकच प्रश्न राहूनराहून माझ्या मनाला अस्वस्थ करीत होता—मालतीने आपलें जीवन कसें घालवावें हें ठरविण्याचा हक्क कुणाला आहे? मालतीला की बाबासाहेबांना? समाजसेवा हें पुण्य आहे; पण लग्न म्हणजे कांही पाप नव्हे! ज्या मालतीकडे पाहून बाबासाहेब 'ही माझी मुलगी आहे' असें अभिमानाने म्हणाले होते, ती त्यांना लग्न केल्यामुळेच झाली होती ना? बाबासाहेबांनी लग्नच केलें नसतें तर? या प्रश्नाचें त्या वेळींहि मला हसूं आलें होतें. बाबासाहेबांनी लग्न केलें नसतें तर त्यांना 'ही माझी मुलगी आहे' असें अभिमानाने म्हणतां आलें नसतें हें खरें; पण मग मी तरी त्यांच्याकडे कशाला गेलों असतों?

त्या मनोभंगामुळे मीं मद्यपान सुरू केलें नाही किंवा दाढीहि वाढविली नाही. उलट अंतरींची व्यथा विसरण्याकरिता जोराने पुढल्या अभ्यासाला सुरवात केली. सकाळपासून रात्रीपर्यंत कामाचा चरक असा फिरत असे, की आपलें दुःख उगाळीत बसायला मनाला वेळच मिळत नसे. जखमा झालेला शिपाई लढत कसा राहतो हें लहानपणीं मला पडलेलें कोडें त्या अनुभवाने सुटलें. क्लोरोफॉर्मच्या गुंगींत रोग्याला शस्त्रक्रियेची जाणीव कुठे होते? लढणाऱ्या शिपायाच्या मनालाहि अशीच एक धुंदी येत असते; पण धुंदींत त्याला जखमांच्या वेदना जाणवतच नाहीत.

मात्र रात्रीं अंथरुणाला पाठ टेकल्यावर झोप येईपर्यंत जीं पांच मिनिटें जात, त्या अवधींत मालतीची मूर्ति माझ्या डोळ्यांपुढे उभी राही.

त्या मालतीकडे पाहून मला स्वतःच्या मनोभंगापेक्षाहि दुसऱ्याच एका गोष्टीचें अ.िक वाईट वाटे. मालतीला तिच्या वडिलांनी लहानाची मोठी केली असेल, तिच्यासाठी खूप खस्ताहि खाल्ल्या असतील; पण एवढ्यामुळे तिने आयुष्यांत काय करावें आणि काय करूं नये हें ठरविण्याचा सर्वाधिकार त्यांनी आपल्या हातीं घ्यावा हा एक प्रकारचा जुलूमच नाही का?

ज्वालामुखीचा स्फोट झाला म्हणजे त्यांतून जसा ऊष्ण लाव्हा वाहूं लागतो, तशा अनेक जळत्या कल्पना पांच मिनिटांत माझ्या डोळ्यांपुढून नाचत जात.

मला वाटे, निरपेक्ष प्रीतीपेक्षा दुसऱ्यावर सत्ता गाजविण्याची इच्छाच मनुष्याच्या मनांत अधिक प्रभावी असते! याला आईबापसुद्धा अपवाद नाहींत!

बाबासाहेबांनी मालतीपासून कृतज्ञतेची अपेक्षा करणें रास्त होतें. पण कृतज्ञता म्हणजे कांही गुलामगिरी नव्हे!

एका पिढीने आपलीं मतें दुसऱ्या पिढीवर लादणें ही केवढी मोठी चूक आहे! बाबासाहेबांचा मूळ पुरुष असलेला एखादा वसिष्ठ अगर भारद्वाज ऋषी आज त्यांच्यापुढे येऊन उभा राहिला आणि त्याने 'माझ्यासारखा जटाभार तुझ्या डोक्यावर कां नाही' असें बाबासाहेबांना विचारलें, तर त्याला हे काय उत्तर देतील?

या शेवटच्या विचाराने माझें मलाच हसूं येई आणि हसतांहसतांच मी झोपीं जाई.

चित्रपट मध्येच तुटावा त्याप्रमाणें माझी ही स्मृतिमालिका एकदम भंग पावली.

तारेचा कागद मला म्हणत होता—'लगेच निघा!'

दहा वर्षांपूर्वी मालतीविषयी माझ्या मनांत ज्या भावना उचंबळून येत असत, त्यांचा आज कुठेच पत्ता नव्हता!

पण हुरहुरणारें मन म्हणत होतें—मालतीला काय होतंय् तें तरी पाहू या ! ज्या वृक्षाच्या छायेंत मनुष्याने कांही क्षण आपला प्रवासाचा शीण घालविलेला असतो, तो निष्पर्ण झाल्यावर त्याच्याकडे त्याने ढुंकूनसुद्धा न पाहाणें योग्य होईल काय ?

मानसशास्त्राचा अभ्यास केलेलें माझें मन म्हणत होतें—आपण कलकत्त्याला गेलों आणि मालतीला पाहून आपल्या पूर्वीच्या भावना जागृत झाल्या तर ? आपण जाऊं नये हेंच चांगलें.

पण भावनाशील हृदय गुणगुणत होतें—ज्या मालतीवर तूं कांही दिवस जिवाभावाने प्रेम केलेंस, ती अतिशय आजारी असतांना तूं न जाणें तुला शोभतें का ? कदाचित् तुझ्या दृष्टिभेटीसाठी तिचे प्राण डोळ्यांत येऊन उभे राहिले असतील आणि तूं—

* * *

मी कलकत्त्याला जायची तयारी करीत आहे हें ऐकतांच माझ्या पत्नीला मोठें आश्चर्य वाटलें. 'केस आहे वाटतं ?' तिने प्रश्न केला. आपल्या नवऱ्याची कीर्ति बंगालपर्यंत पोचल्याचा आनंद तिच्या मुद्रेवर नाचत होता.

खरें बोलणें जवळजवळ अशक्यच होतें. कुणाची केस म्हणून तिनें विचारलें तर ?

मीं उत्तर दिलें, 'छेः ! परवा त्रिपुरीला जायला मिळालं नाही; तेव्हां ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची बैठक तरी बघाची म्हटलं. कलकत्त्याला काय होतंय् इकडे साऱ्या देशाचे डोळे लागून राहिले आहेत !'

मला एकदम आलेला राजकारणाचा पुळका तिला कितपत खरा वाटला कुणाला ठाऊक ! पण तिने मोठ्या लगबगीने फराळाचे जिन्नस केले. ते डब्यांत भरतांभरतां ती उद्गारली, 'या निमित्तानं तरी विसावा मिळेल आपल्याला !'

घरांतल्या बाळगोपाळ मंडळींनी कलकत्त्याला येण्याचा हट्ट धरला. त्यांची समजूत घालतांघालतां नाकीं नव आले अगदी. लाचलुचपतीने त्यांचीं तोंडें कशीबशीं बंद करून मीं स्टेशन गाठलें.

मात्र गाडींत बसल्यावर त्यांचा तो लाडका हट्ट पुनःपुन्हा माझ्या डोळ्यांपुढे उभा राहूं लागला. लग्नानंतर पत्नी माहेरीं गेली म्हणजे जसें उदास वाटे, तसें आता मुलांची आठवण होऊन माझें मन खिन्न झालें.

धाकटी मंदा पापा देण्याकरिता तोंडाचा जो चंबू करी, तो आठवून मला वाटलें, त्या चंबूंत अमृत आहे हेंच खरें !

डॉक्टर म्हणून मला कीर्ति मिळाली होती, पैसा मिळाला होता. पण आता प्रवास करतांना मला त्या साऱ्या गोष्टींचा विसर पडला. मनुष्याचें सामाजिक मन संतुष्ट झालें तरी त्याचें वैयक्तिक मन तृप्त झाल्याशिवाय तो सुखी होत नाही असा विचार या वेळीं माझ्या मनांत चमकून गेला.

कल्याणला माझ्या डब्यांत दोन खादीवेषधारी गृहस्थ आले. त्यांत एक पंचेवाले होते. दुसरे सुटाबुटांत होते. त्यांचें मनोरंजक संभाषण ऐकताऐकतां मला घराचा विसर पडला.

अगदी हमरीतुमरीवर येऊन बोलत होते ते ! पंचेवाले उघडउघड गांधींच्या बाजूचे होते. सुटांतल्या सद्गृहस्थांनी सुभाषबाबूंची कड घेतली होती.

त्यांचें संभाषण ऐकतांऐकतां मी पेंगूं लागलों; पण एकदम एका खटक्याने माझे डोळे उघडले.

सुभाषबाबूंची वकिली करणारे ते गृहस्थ म्हणत होते, ' गांधींना हजार खून मी माफ करीन ! पण त्यांचा एक दोष मात्र— '

' कुठला ? ' पंचेवाल्यांनी तिरसटपणाने प्रश्न केला.

' गांधींना गुलाम आवडतात ! त्यांना स्वतंत्र बुद्धीचीं माणसं नकोयत ! '

पंचेवाल्यांनी रागाने पाठ फिरविल्यामुळे हें संभाषण मध्येच थांबलें.

पण माझ्या मनांत मात्र एक विचारचक्र सुरू झालें.

गांधी आणि हजार खून ?

त्या असंबद्ध विचारांच्या लाटांवर तरंगत असतांना आपला डोळा केव्हां लागला हें माझें मला कळलेंसुद्धा नाही.

मी जागा झालों तों डब्यांत शिरणाऱ्या माणसांच्या कलकलाटाने किंवा स्टेशनवरल्या ' चाय्'च्या आरोळ्यांनी नाही, तर एका विचित्र स्वप्नाने !

त्या स्वप्नांत मालतीचे वडील आणि महात्मा गांधी अगदी जवळ बसून गप्पा छाटीत होते. द्रोणांतून शेळीचें दूध पितांपितां बाबासाहेब गांधींना म्हणाले, ' हें पाहा मोहनदास, तुमचं नी आमचं तत्त्वज्ञान अगदी एक आहे ! '

पुढे गांधी काय बोलले हें ऐकूं येण्याचा आधीच मी जागा झालों होतों.

* * *

कलकत्त्याला बाबासाहेबांच्या बिऱ्हाडीं पाऊल टाकल्याबरोबर दारांतच मला मालती दिसली.

मी चकित झालों. तारेवरून मालती अगदी अंथरुणाला खिळली असावी असा माझा ग्रह झाला होता.

पण माझ्यापुढे उभी असलेली मालती धडधाकट दिसत होती, चांगली अंगाने सुटलेली होती,

तिने हसून माझें स्वागत केलें. मीं तिच्याकडे पाहिलें. तिची दृष्टि मला जरा विचित्र वाटली. एखाद्या खोल आडांत नुसता काळोख दिसावा आणि पाण्याचा मात्र पत्ता असूं नये—तसे वाटले तिचे डोळे मला !

, काय होतंय् तुला ? ' मीं विचारलें.

' कुणाला ? मला ? कुणी सांगितलं तुम्हाला ? ' ती हसली. पण हसतां-हसतां तिची दृष्टि अधिक शून्य झाली.

मी कोड्यांत पडलों.

× × ×

बाबासाहेबांनी एकान्तांत नेऊन मला कांहीं गोष्टी सांगितल्या तेव्हा कुठे मला मालतीच्या आजाराची थोडीशी कल्पना आली.

मालतीच्या भावाला कलकत्त्याच्या बँकेंत नोकरी लागली तेव्हा ही सारी मंडळी इकडे आली. मालती एका शाळेंत मास्तरीण झाली. पुढे बदली होऊन

भाऊ कलकत्त्याबाहेर गेला. पण मालती आपली शाळेंत अगदी रमून गेली होती. तिच्यासाठी बाबासाहेबांनीहि कलकत्त्यांतच राहायचें ठरविलें.

सुमारें दोन वर्षांपूर्वी मी दुसऱ्यांदा परदेशी जाऊन मोठी पदवी घेऊन आलों, तेव्हा माझे फोटो बहुतेक वृत्तपत्रांत आले. त्यांतला एक फोटो कापून तो फ्रेम करून घेऊन मालतीने त्याची पूजा करायला सुरवात केली. बाबासाहेबांना त्याचा पत्ता लागला तोसुद्धा योगायोगानें. कुठल्याशा कपाटाची किल्ली त्यांना हवी होती. मालती घरीं नव्हती. हरवलेल्या किल्लीच्या जोडीची किल्ली मालतीच्या जुडग्यांत असेल म्हणून त्यांनी तिच्या टेबलाचा खण उघडून पाहिल तों आंत फुलें वाहिलेला फोटो !

पुढें कांही दिवसांनी मालतीने पहिली शाळा सोडून एका किंडरगार्टन पद्धतीच्या बालकमंदिरांत नोकरी धरली.

ही नोकरी धरल्यापासून वर्ष दीड वर्ष ती अतिशय आनंदांत होती. त मंदिरांतल्या मुलांना खाऊ नेऊन देई आणि त्यांना शिकविलेली गाणी घरीं गुण गुणत बसे. गरीब मुलांना कपडे शिवून द्यायला आपल्याला एक यंत्र ह असेंहि तिनें वडिलांना सांगितलें.

पण गेल्या दोनतीन महिन्यांत तिची ही आनंदी वृत्ति एकदम बदलल ती जेवेनाशी झाली. रात्रीं दोनदोन वाजेपर्यंत ती जागी राही; पण आत पूर्वीप्रमाणे तिच्या हातांत पुस्तक मात्र नसे. चांदणी रात्र असली की त खिडक्या लावून घेई. काळोख्या रात्रीं मात्र खिडक्या उघड्या टाकून त तासन् तास अंधाराकडे टक लावून पाहात बसे.

पुढेपुढे तर ती वेड्यासारखी वागूं लागली. सकाळीं उठल्याबरोबर बाग तलीं फुलें तोडायच्याऐवजी कळ्या खुडून त्यांचा चोळामोळा करायचा सपा तिनें सुरू केला. माळ्याची मुलगी एकदा आपली बाहुली बागेंत विसरली होत हिने ती उचलून आपल्या खोलींत नेऊन ठेवली. त्या मुलीने मालतीला आप बाहुली कुठे सापडली का म्हणून विचारलें. मालतीने सरळ 'नाही' म्हणून उत्त दिलें आणि दुसरें दिवशी सकाळी मालतीचें अंथरूण गुंडाळणाऱ्या मोलकरणीला त बाहुली तिच्या बिछान्यांत सांपडली.

या दोनतीन महिन्यांत तिला दोनचार वेळां फिट्स आल्या. फिटमधून सावध होतांना दर वेळीं ती माझें नांव घेई.

बाबासाहेबांना मला तार केली ती अशीच मोठी फीट आली असतांना !

*　　　*　　　*

मालतीच्या रोगाचें निदान करणें जितकें सोपें होतें, तितकेंच तें बाबा-साहेबांना पटवून देणें कठीण होतें.

दहा वर्षांपूर्वी बाबासाहेबांनी मालतीच्या मनाला आपल्या विचारांच्या साखळदंडांनी जखडून टाकलें. पण गुलामाचे हातपाय बांधतां आले तरी त्याचें मन कांही बांधून ठेवतां येत नाहीं हा अनुभव त्यांनाहि यायचा होता.

पूर्वीची शाळा सोडून बालकमंदिरांत मालतीने नोकरी धरली ती वात्सल्याची अतृप्त तहान भागविण्याकरताच असली पाहिजे. पण कांही दिवस तिथल्या मुलांत ती रमली आणि मग असे वेड्यासारखे चाळे करूं लागली याचें कारण काय असावें ? तिच्या मनाला धक्का देणारी गोष्ट मध्यंतरी घडली असेल का ?

काय बरें असावी ती गोष्ट ?

हा मधला दुवा मिळेपर्यंत बाबासाहेबांच्याजवळ कांही बोलायचें नाही असें मीं ठरविलें. एवीतेवी इतका लांब आलों होतों. तेव्हां कलकत्ता पाहावें, ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या बैठकीला प्रेक्षक म्हणून जाऊन सर्व पुढाऱ्यांचें दर्शन घ्यावें आणि मालतीच्या रोगाचें निदान बाबासाहेबांना सांगून परत कूच करावें असें मी ठरविलें.

*　　　*　　　*

एखाद्या देवळांत देवदर्शनाला जावें आणि तिथे बडवे व भक्त यांची मारामारी पाहायला मिळावी तसें कांहीतरी वाटूं लागलें मला तें दृश्य पाहून.

राजेंद्रबाबूंसारखा सालस पुढारी, पण त्याचें भाषण ऐकून घ्यायला प्रेक्षक तयार होईनात !

"आम्हांला हाकलून दिल्याशिवाय आम्ही सभेचें काम पुढे चालूं देणार नाही" असेंहि कित्येकांनी ओरडून सांगितलें. मंडपांतून बाहेर पडतांना तर

दंग्याला ऊतच आला. पुढाऱ्यांना गराडा घालणें, धक्काबुक्की करणें, दगड फेकणें—बेफाम झालेल्या त्या प्रेक्षकांचा मला असा राग आला !

पण एका पार्कमध्ये जाऊन स्वस्थ बसल्यावर मात्र माझ्या मनांत निराळे विचार येऊं लागले.

प्रेक्षकांचा राग राजेंद्रबाबूंवर नव्हता; सुभाषबाबूंना राजीनामा द्यायला लावणाऱ्या परिस्थितीवर—त्या परिस्थितीमागे असलेल्या संकुचित मनो वृत्तीवर होता.

गांधींच्या इच्छेविरुद्ध सुभाषबाबू त्रिपुरीला अध्यक्ष झाले म्हणूनच ह प्रसंग त्यांच्यावर आला. याचा अर्थ --

याचा अर्थ उघड होता. त्या दिवशीं डब्यांत मीं जें वाक्य ऐकलें होत तेंच खरें आहे—" गांधींना गुलाम आवडतात ! "

म्हणजे स्वातंत्र्यासाठी अवतरलेल्या महात्म्यांच्या अंतरंगांत सुद्धा स्वामित्न गाजविण्याची भावना असतेच म्हणायची !

पण जगांत कुणालाहि जन्मभर गुलाम राहाण्याची इच्छा नसते. सुभाष बाबूंच्या हवाली राजकारणाचीं सूत्रें करून नी त्यांना सहकार्याचें आश्वासन देऊ गांधी आपल्या चरखा, खादी आणि मंडळींकडे वळले असते तर --

तर प्रेक्षकांनी ' महात्मा गांधीकी जय ' अशा आरोळ्यांनी सारा मंड दुमदुमवून सोडला असता.

वैयक्तिक सभ्यतेच्या दृष्टीने प्रेक्षकांचा तो दंगा वाईट होता; प गुलामगिरीविरुद्ध बंड पुकारण्याच्या हक्काच्या दृष्टीने —

जो हक्क मालतीचें मन विकृत रीतीने बजावूं लागलें होतें, तोच हा प्रेक्षकांनीहि विकृत पद्धतीने बजावला होता.

गुलामांच्या विकृत वर्तनाची जबाबदारी कुणावर ? गुलामांवर की त्यांन गुलाम ठेवणाऱ्या लोकांवर ?

माझ्या मनांत विलक्षण वादळ सुरू झालें. पर्वतप्राय लाटांप्रमाणे विच उठूं लागले. मला वाटलें, जगांतून गुलामगिरीचा नायनाट झाला आहे ही गो

अगदी खोटी ! जुन्या काळच्या गुलामगिरीने आता सभ्य स्वरूप धारण केलें आहे एवढेंच ! पण सोन्याच्या पेल्यांतून विष दिलें म्हणून कांही तें पिणारा मेल्यावांचून राहात नाही.

मी बिऱ्हाडीं जायला निघालों तेव्हा खूप काळोख पडला होता. एका कोपऱ्यावरल्या हॉटेलांत एक रेकॉर्ड लागली होती. गाण्याचे सूर बरे वाटले म्हणून मी थांबलों. गायिका--शांता आपटेच असावी ती-- गात होती--
' है दुनिया मे पाप गुलामी-- '

× × ×

बिऱ्हाडीं आलों तों बाबासाहेब मालतीला शोधायला बाहेर गेले आहेत असें कळलें. ती जी संध्याकाळीं फिरायला म्हणून बाहेर गेली होती ती अद्यापि परतच आली नव्हती !

बाबासाहेब येईपर्यंतचा एक तास मला अगदी युगासारखा वाटला. मी खिडकींतून बाहेरच्या काळोखाकडे पाहात उभा होतों. आजच्या बैठकींतला प्रेक्षकांचा तो दंगा आणि मालतीचें हें नाहीसें होणें यांत कांहीतरी साम्य आहे असें मला वाटूं लागलें.

बाबासाहेब आले ते थेट माझ्या खोलींत ! अगदी निराश होऊन आले होते ते. मालतीचा कुठेच पत्ता नव्हता !

वादळांत उन्मळून पडणाऱ्या एखाद्या जीर्ण वृक्षाप्रमाणे ते आरामखुर्चीत पडले. डोळे पुसून घोगऱ्या स्वराने ते म्हणाले,

' तार तरी करून बघूं या. लिहितां का जरा ? '

लिहिण्यासाठी म्हणून मी टेबलाकडे गेलों, तों तिथे एक पाकीट पडलेलें दिसलें. संध्याकाळच्या डाकेने घरचें पत्र आलें असेल अशा समजुतीने मीं तें उघडलें. ' मंदा तुमची फारफार आठवण काढते ' असें बायकोने पत्राच्या शेवटीं लिहिलें असेल म्हणून मी अगदी खाली पाहिलें. तिथे सही होती—
' मालती. '

गोंधळलेल्या मनःस्थितींत मी तें पत्र वाचूं लागलों.

माझ्या नांवापूर्वी ' प्रिय ' शब्द घालून तो तिने खोडला होता. एखाद्या वीज पडलेल्या घरासारखा वाटला तो मला.

*  *  *

मी आज हें घर सोडून जात आहें. मी गेल्यामुळे बाबाना फार फार वाईट वाटेल. पुष्कळ वर्षे पाळलेला पोपट पिंजऱ्यांतून उडून गेला म्हणजे त्याचा धनीसुद्धा रडतो. नाही का ? बाबांनाहि तसेंच दुःख होईल.

' दहा वर्षांपूर्वी बाबांनी मला लग्नाची परवानगी दिली असती तर ? तर मी सुखी झालें असतें; पण त्यांना मात्र एका गुलामाला मुकावें लागलें असतें.

' त्यावेळी भित्रेपणाने मी बाबांचें ह्मणणें मान्य केलें; पण शाळेंत शिक्षकीण झाल्यावर लवकरच मला कळून चुकलें की, माझ्यासारखी माणसें नुसत्या भक्ती-वर जगूं शकत नाहीत. त्यांना प्रीतीहि हवी ! भक्ति हें आयुष्याच्या वेलीला येणारें फूल आहे. पण प्रीति हें त्या वेलीच्या मुळांना जगविणारे पाणी आहे.

' अधिक लिहून काय करायचेंय् ? तुम्ही डॉक्टर आहांत. मानसशास्त्राच्या दृष्टीने रोगांचा विचार करायला शिकलां आहांत. माझ्याबरोबरीच्या शिक्षकिणींची लग्नें होऊं लागलीं, माझ्या हाताखाली शिकलेल्या मुली आपलीं बाळसेदार मुलें पाहायला मला घरीं बोलावूं लागल्या, तेव्हा माझ्या मनाची काय स्थिती झाली असेल याची तुम्हांला सहज कल्पना करतां येईल.

' स्वप्नांनी तर मला अगदी भंडावून सोडलें. एखादे वेळीं कुणीतरी ' आई ' ह्मणून मला हाक मारली आहे असा भास होई, तर एखादेवेळीं मी पदराखाली मूल घेऊन बसलें आहे असें दृश्य दिसें. एकदा स्वप्नांतून मी किंचाळतच जागी झालें. बाबा धावून आले. त्यांनी ' काय झालं !' ह्मणून मला विचारलें. पण कोणत्या तोंडाने मी मला पडलेलें स्वप्न त्यांना सांगायचें ? त्या स्वप्नांत एक डॉक्टर मला म्हणत होते—' मूल कापून काढल्याशिवाय तुमची सुटका होणार नाही. '

दादा येथे होता तोंपर्यंत वहिनीशीं बोलण्यांत आणि तिच्या मुलांशीं खेळण्यांत माझा वेळ जाई; पण दादाची बदली झाल्याबर मी एकटी पडलें

आणि मग– बाबांची ज्ञानेश्वरी आणि थिऑसफी यांत माझें मन थोडेंच रमणार होतें !

लहान मुलांत मिसळलें म्हणजे बरें वाटेल, म्हणून मीं बालकमंदिरांत नोकरी धरली. माझ्या आयुष्याच्या बागेंत फुलें फुललीं असें मला त्या वेळीं वाटलें.

पण मुलांच्या या निकट सहवासानें आपल्याला मूल नाही ही जाणीव मला तीव्रतेनें होऊं लागली. बालकमंदिरांत मालकाचीं मुलें पोचवायला येणाऱ्या एका गरीब बाईच्या मुलावर मी माया करूं लागलें. चारसहा महिन्यांत तें मूल माझा जीव की प्राण होऊन बसलें. एखाद्या वेळीं मी त्याला घरींसुद्धा घेऊन येत असे; पण कांहीं दिवसांनी त्या बाईने ती नोकरी सोडली. ती परगावीं जाणार होती. माझ्यापाशी मूल ठेवण्याबद्दल मीं तिच्या विनवण्या केल्या. तिनें उत्तर दिलें–' नऊ महिने पोटांत वाढविलंय् मीं याला. जीव देईन, पण––'

त्या दिवशीं रात्रीं मला पहिली फिट आली.

बाबांना म्हणावें– मालतीची जगण्याची इच्छा आहे म्हणून ती बाहेर जात आहे. तुम्हीं तिच्यावर फार फार प्रेम केलेंत हें ती विसरली नाही. पण तें प्रेम करण्यासाठी तुम्हीं तिला पिंजऱ्यांत ठेवलेंत. तेवढा पिंजरा नसता तर–

पुढे काय करायचें तें मी अजून ठरविलें नाही. पण मी दादाकडे जाणार नाही. आज ना उद्या तिथेहि माझ्याभोवती एखादा सोन्याचा पिंजरा निर्माण होईल.

कुठेतरी स्थिर झालें की खुशालीचें पत्र पाठवीन असें बाबांना सांगा.

× × ×

भुसावळ स्टेशन मागे पडल्यावर माझा डोळा लागला; पण लवकरच मी जागा झालों. किती विचित्र स्वप्न पडलें होतें मला !

बाबासाहेब आणि गांधीजी गप्पा छाटीत बसले आहेत, समोर शेळीच्या दुधाने भरलेले द्रोण आहेत, गांधीजी बाबासाहेबांना दूध घेण्याचा आग्रह करीत

आहेत; पण बाबासाहेब म्हणतात, ' काय थंडी पडली आहे बाहेर ! हें दूध नको बुवा आपल्याला ! ' गांधीजी आश्चर्यानें विचारतात, ' मग काय हवं ? '

' चहा ! '

यापुढचें गांधीजीचें बोलणें ऐकण्याची फार इच्छा होती, पण ते कांहीच बोलले नाहीत. मला वाटलं, सोमवार सुरू झाला असावा तेव्हां मौनव्रत पाळण्याकरिता गांधीजी गप्प बसले असतील.

इतक्यांत खण्कन् कसलातरी आवाज झाला. मी पाहिलें तों गांधीजी हातांतील सोटा जमिनीवर आपटीत आहेत—बहुधा दांडी सत्याग्रहाच्या वेळचा असावा तो !

पण तो आवाज सोट्याचा नव्हता. गाडी एका स्टेशनांत येउन उभी राहिली तेव्हाचा धक्का होता तो !

गाडी लगेच सुरू झाली. तिच्या चाकांतून आवाज ऐकूं येत होता—पिंजऱ्याबाहेर—पिंजऱ्याबाहेर—



# दादू—

त्या दोन खोल्या कांही विशेष मोठ्या नव्हत्या. पण स्वतंत्र जागा, समोर छोटीशी बाग, बागेच्या मध्याभागीं हवें तेव्हां पाणी देणारा पंप, एका फर्लांगाच्या अंतरावर असलेला विस्तीर्ण माळ, त्या माळावरून दूर दिसणारें देवळाचें रेखीव दृश्य—एल्‌एल्‌. बी. चा अभ्यास करायला मी आलों होतों खरा! पण माझी विशी नुक्तीच मागें पडली होती! मग कायद्यापेक्षां काव्याचा पगडा माझ्या मनावर अधिक असावा यांत नवल कसलें?

खोल्या दाखवणाऱ्या मालकाला मी म्हटलें, 'जागा पसंत आहे आपल्याला. हे घ्या आठ रुपये!'

मी पाकीट उघडूं लागलों.

'आठाला जागा देणं पुरवणार नाहीं आम्हाला!'

'पण मागं जे विद्यार्थी राहात होते ते आठच देत होते!'

'पण—पण बागेसाठीं माळी ठेवावा लागतो, पंपाला मधनं मधनं तेल घालावं लागतं—'

बागेंत पसरलेल्या वाळूचे पैसे सुद्धा तो माझ्याकडून वसूल करून घेणार कीं काय हें मला कळेना !

त्याने दहा रुपये भाडें सांगितलें. मुलगी पहायला गेल्यावर ती आवडली तरी मुद्रेवर तसें दाखवूं नये; नाहीतर हुंड्याचा भाव एकदम घटतो, असें माझा एक मित्र नेहमी म्हणत असे. जागा आवडल्याचें दाखविलें कीं तिचा भाव चढतो ही त्या सुभाषिताची दुसरी बाजू आतां माझ्या अनुभवाला येत होती.

हो नाही करतां करतां नऊ रुपयांवर आमची तडतोड झाली.

' या खोल्यांचा आणखी एक फायदा आहे तुम्हांला ! ' मालक खेळीमेळीने म्हणाले.

भाड्यांत रुपया वाढवून पाहण्याची प्रस्तावना पुन्हां सुरू झाली कीं काय हे मला कळेना ! मी मुकाट्याने ऐकूं लागलों.

' इथं गांवाबाहेर गडी मिळतांना मारामार होते. पण या खोल्यांचं नशीब मोठं चांगलं आहे ! '

लग्नांपासून वर्तमानपत्रांपर्यंत ज्योतिषाचा सुळसुळाट मी सर्वत्र पाहात आलों होतों. ती साथ भाड्याने द्यायच्या खोल्यांपर्यंत येऊन पोंचली कीं काय अशी मला शंका आली. या खोल्यांची रास कोणती असावी याचा मी विचार करूं लागलों. पण पुढल्याच वाक्याने माझ्या शंकेचें निरसन झालें.

मालक म्हणाले ' या खोल्या झाल्यापासनं एल्एल्. बी. च्या विद्यार्थ्यांशिवाय त्यांच्यांत दुसरं कुणी राहिलं नाही. नि दादूशिवाय त्या विद्यार्थ्यांचं कामही दुसऱ्या कुणी केलं नाही ! तीन रुपये नि उरलं सुरलेलं अन्न एवढ्यावर खूष असतो तो ! '

दादू ही कसली वल्ली आहे हें पाहण्याची उत्सुकता माझ्या मनांत उत्पन्न झाली.

नोकर आणि नटी एके ठिकाणी फार दिवस काम करीत नाहीत हा तर जगाचा नेहमीचा अनुभव आहे !

या नियमाला अपवाद असणरा हा दादू—कसा बरें दिसत असेल तो ?

× * *

दादू समोर येऊन उभा राहीपर्यंत माझ्या मनाने त्याच्याविषयीं इतक्या कल्पना केल्या कीं—

दादू दिसतांच कल्पनाशक्ति हा देवाने मनुष्याला दिलेला सर्वांत मोठा शाप आहे या उक्तीची मला खात्री पटली.

संध्याकाळीं रस्त्याने जातांना तो जर माझ्या अंगावरून गेला असतां तर एक दारुड्या म्हणूनच मी त्याच्याकडे पाहिलें असतें.

एक खांदा विचित्र रीतीने उडवीत चालण्याची त्याला लकब होती. त्यामुळें तो माझ्यापुढें येऊन उभा राहिला, तेव्हा त्याचें चालणें मला झिंगलेल्या माणसाच्यासारखे वाटलें. स्वारीने अंगांत नुसता एक फाटका कोट घातला होता. त्या कोटाला बटणें तरी असावीत ? अगदीच मॅडमुल्ला दिसत होता तो ! त्याच्या उघड्या छातीवर पिकलेल्या केसांचा एक पुंजका मधेंच उठून दिसत होता ! तो पाहून वाळलेल्या गवताची आठवण झाली मला !

वाढलेली दाढी खाजवीत खाजवीत तो माझ्याशीं बोलूं लागला, तेव्हा माझ्या मनांत आलें—या बावळट म्हाताऱ्याला आपण गडी म्हणून ठेवणें महामूर्खपणाचें होईल. कॉलेजांतले दोस्त वेळींअवेळीं चहा प्यायला आपल्याकडे येणार ! हें ध्यान पाहून आपली नाही नाही ती थट्टा केल्याशिवाय कधींही राहणार नाहींत ते ! तो केश्या रानडे तर मुलखाचा फटकळ आहे ! दादूच्या अवतारावर कांहीतरी भलतीच कोटि करायचा तो ! नि तो जहागिरदाराचा मुलगा तर आपल्याच वर्गांत येणार आहे. क्रिकेटच्या शोकामुळें त्याची नि आपली लौकरच ओळख होईल. त्याचें आपल्याकडे येणें जाणें सुरू झाल्यावर या दादूसारख्या आचरटाच्या हातून त्याची उठाबस कशी होणार !

हे सारे विचार क्षणार्धांत मनांत येऊन गेले. पण 'मला तुझ्यासारखा गडी नकोय्' असें दादूच्या तोंडावर सांगायचें माझ्या जीवावर आलें.

म्हाताऱ्या माणसाचे चेहरे किती केविलवाणे दिसतात !

ही बावळट पीडा चुकवायची एक नवीन युक्ति मला सुचली. मालकाने जातां जातां भाड्यांत एक रुपया वाढविलाच होता. तसाच दादूही कांहीतरी भरमसाट पगार मागेल. गतवर्षाचे विद्यार्थी त्याला तीन रुपये देत होते हें मघाशीं मालकाकडून आपल्याला कळलेंच आहे. तेव्हां दादूने चार किंवा पांच रुपये मागितले कीं तुझ्यासारखा लबाड मनुष्य मला नको असें आपल्याला सहजच म्हणतां येईल !

असा पोक्त विचार करून मी दादूला म्हटलें, ' मी सांगेन तें काम करावें लागेल तुला ! '

त्याने मोठ्या आनंदाने मान डोलावली.

' पगार काय घेणार तूं ? ' मी प्रश्न केला.

त्याने हंसत उत्तर दिलें ' मागचे साहेब देत होते तेवढाच द्या ! '

' अरे, पण तेवढा म्हणजे किती ? आतां चोर बरोबर सापडणार या कल्पनेने मी हंसत हंसत विचारलें.

' तीन रुपये देत होते ! ' दादूने उत्तर दिलें.

मी चकित झालों. खोल्यांच्या श्रीमंत मालकामधें जो प्रामाणिकपणा नव्हता, तो या अडाणी गड्यांत दिसतांच माझ्या मनांत एक कसली तरी उज्ज्वल छटा चमकून गेली.

मी कांहीच बोलत नाहीं असें पाहून दादू म्हणाला ' पावणेतीन रुपयांवर सुद्धां राहीन मी साहेब ! '

ती वाढलेली दाढी, तो सुरकुतलेला चेहरा, उघड्या छातीवरला तो पांढऱ्या केंसांचा विचित्र पुंजका—ह्या साऱ्या कुरूपतेच्या आड एक प्रकारचें माधुर्य आहे असा मला भास झाला.

*　　　*　　　*

हा भास क्षणिक नव्हता.

'मी सांगेन तें काम करायला हवं' असें कामावर ठेवतांना मी दादूला बजावलें होतें. पण मला त्याला कांही सांगण्याचा प्रसंगच येत नसे. अनेक वर्षे माझ्याच वयाच्या विद्यार्थ्यांचें काम केल्यामुळें माझ्या आवडी—निवडी, सोयी गैरसोयी सारें कांही त्याला न सांगतांच कळे. मी सकाळीं उठण्याच्या आधींच गवळ्याच्या घरून तो दूध घेऊन येई. मी उठून चूळ भरायला लागलों कीं दादूचा स्टोव्ह फुरफुरूं लागलाच ! मला चहांत कमी साखर लागते हे त्याला दुसऱ्यांदा कांही सांगावें लागलें नाहीं.

परटाकडे कपडे देणें, ते परत आले म्हणजे मोजून घेणें, खाणावळींतून वेळेवर डबा घेऊन येणें, मी सकाळीं आंघोळ केली नसली तर संध्याकाळच्या चहाच्या वेळीं मला पाणी तापवून देणें, माझ्याकडे बसायला मंडळी आली कीं मुकाट्याने जाऊन सिगारेटचीं एकदोन पाकिटें आणणें, सारें कसें एखाद्या यंत्रा-सारखें बिनचूक करीत असे तो !

मला काडीचाही त्रास होऊं नये म्हणून तो जी धडपड करी ती पाहिली कीं मला आईची आठवण होई !

दादू पंपाचे पाणी काढूं लागला कीं माझ्या मनांत येई---या खडकाळ जागेच्या पोटांत जसा पाण्याचा झरा आहे, त्याप्रमाणे वरून रुक्ष दिसणाऱ्या दादूच्या अंतःकरणांतही एक गोड गोड झरा आहे.

पंपापलीकडे बागेच्या कोंपऱ्यांत कडूलिंबाचें झाड होतें. त्याच्याकडे लक्ष गेलें म्हणजे मला वाटे—सृष्टीचे खेळ किती विचित्र आहेत ! या कडूलिंबाची पालवी मोठी नाजुक नि सुंदर दिसते ! उन्हाच्या वेळीं या झाडाच्या सावलींत किती मौज वाटते. असल्या सुंदर झाडाचीं पानें कडू असावींत आणि वरून कुरूप दिसणाऱ्या दादूचें अंतःकरण इतकें प्रेमळ असावें ही केवढी नवलाची गोष्ट आहे !

दादूने माझी सर्व माहिती केव्हांच काढून घेतली होती ! पण स्वतःविषयीं फारसा कधीं बोलत नसे तो ! मात्र एकदोनदां रंगांत येऊन त्याने आपली थोडीथोडी माहिती मला सांगितली होती !

त्याचा मुलगा माझ्या एवढाच होता. सोलापूरला कुठल्याशा गिरणींत होता तो ! दादूचा खेड्यांतला जमिनीचा एक तुकडा सावकाराकडे खूप दिवस गहाण पडला होता. म्हातारपणामुळे शेती होईनाशी झाली तेव्हां बायकोला घेऊन तो इथें आला. आणि त्याने मुलाला सोलापुराला पाठविलें. फार उशीरां झालेला एकुलता एक मुलगा होता तो त्याचा ! 'तुम्हीं आईबाप सोलापुरला मुलाकडंच कां राहत नाहीं ?' म्हणून मी त्याला विचारलें तेव्हां त्यानें उत्तर दिलें 'इथं सत्तेची झोंपडी आहे आमची साहेब ! आम्ही दोघं सोलापुरला गेलों कीं तिथं पोराचा खर्च वाढणार ! मग तो सावकाराकडली जमीन सोडवून कशी घेणार ? बायको इथं मोड विकून चार पैसे मिळविते. सोलापुरांत ती काय करणार ? तिथं मोड खपतात कीं नाही देव जाणे ! नि सोलापुरांत कांही कॉलेजं नाहीत माझ्यासारख्या म्हाताऱ्याला हवं तें काम मिळायला !'

'पण मुलावांचून कसं करमतं रे तुला ?' मी प्रश्न केला होता.

'न करमायला काय झालं ? साहेब, माझा मुलगा मला सोडून गिरणींत गेलाय्. तुम्ही आईबापांना सोडून कॉलेजांत आलाय् ! मी इथं तुमचं काम करतोय ना ! सोलापुरांत कुणीतरी म्हातारी त्याला जेवायला घालीत असेल !'

मोठें विचित्र तत्त्वज्ञान वाटलें हें मला ! मात्र त्या दिवशीं पावणेतीन रुपयांवर माझें काम पतकरायला दादू तयार कां झाला होता हें कोडें मला त्या वेळीं थोडेसें उलगडलें ! हा म्हातारा माझ्यासारख्याचें काम करून मुलाच्या सहवासाची अतृप्त इच्छा अंशतः पूर्ण करून घेत असावा ! बिचारा दुधाची तहान पाण्यावर भागवीत होता.

* * *

तीन महिन्यांत दादूची नि माझी कमींत कमी तीन वर्षांची ओळख आहे असें मला वाटूं लागलें. कांही काही विलायती वेलींना अगदीं लवकर फुलें येतात. नाही ? दादूसारख्या माणसांचीं मनेंही तशींच असतात !

क्रिकेट जोरांत सुरू झाल्यामुळें कित्येकदां रात्रीं आठ आठ वाजेपर्यंत मी बिऱ्हाडीं येत नसे. पण मला कितीही उशीर झाला तरी ओट्यावर अंधारांत दादू माझी वाट पाहत बसलेला असे. 'दिवा लावून बसत जा कीं !' असें मी

त्याला तीनचार वेळां सांगितलें. पण दर वेळीं तो हंसून उत्तर देई ' उगीच बत्ती कशाला जाळायची साहेब ? '

एखाद्या दिवशीं मला यायला फार उशीर झाला नि डब्यांतला भात निवून गेला तर दादू लगेच स्टोव्ह पेटवायला उठे ! ' भाताच्या गारगोट्या झाल्यात, साहेब ! ' असें त्यानें म्हटलें कीं मी उत्तर देई, ' गारगोटींत विस्तव असतो हें ठाऊक नाहीं तुला दादू ! ' माझ्या बोलण्याचा अर्थ कळला नाहीं तरी तो म्हणे, ' साहेब, घरीं तुमच्या आईसाहेब असला भात तुम्हांला खाऊं देतील कां ? '

थंडगार झालेला भात स्टोव्हवर तापविला म्हणून त्याला ऊनऊनीत भाताची गोडी कशी येणार ? पण दादूने ऊन केलेला तो भात खातांना मला फार गोड वाटे—त्या गोडीचा उगम अन्नांत नव्हता, दादूच्या स्वभावांत होता.

एका आदितवारीं दादूची स्वारी क्रिकेटच्या मैदानावर दिसली तेव्हां तर मी थक्कच झालों. स्वतःच्या डोळयांवर विश्वासच बसेना माझा ! रात्री मी त्याला विचारलें तेव्हां म्हातारा पहिल्यांदा लाजेने अगदीं चूर झाला. पण थोड्या वेळाने त्याने जें कारण सांगितलें—

आधल्या दिवशीं मी फार चांगला खेळलों होतों. माझ्या एकसष्ट धांवांत चाराचे आठ टोले होते. दादू सकाळीं खानावळींत डबा आणायला गेला तेव्हां तिथल्या विद्यार्थ्यांत माझ्या पराक्रमाच्याच गोष्टी चालल्या होत्या. त्या ऐकून दादूला वाटलें—आपल्या साहेबांच्या खेळाची सारे लोक इतकी स्तुति करतात. तेव्हां आपणही तो एकदां पहावा !

* * *

सप्टेंबरच्या शेवटच्या आठवड्यांत बाहेरगांवीं एक मॅच ठरली. दादूवर बिन्हाड सोपवून मी मॅचला गेलों. जहागीरदार आमचे कॅप्टन होते. माझें बॅटिंग नि त्यांचें बोलिंग. असा धुव्वा उडविला आम्हीं दुसऱ्या बाजूचा !

मॅच जिंकल्यावर फराळाच्या वेळीं खूप खाल्लं आम्ही !

परत येतांना मी जहागीरदारांच्या कारमधें बसलों. आज ते माझ्यावर फार खूष झाले होते. गाडी हांकणें आणि मॅचच्या गप्पा मारणें या दोन

गोष्टींपैकीं अधिक बेफामपणानें ते कोणती करीत होते हें सांगणें फार कठिण होतें.

खेळतांना मनुष्याला भान नसतें. त्यामुळें मॅचच्या श्रमानें माझें अंग किती आंबून गेलें आहे याची कल्पना गाडींत बसेपर्यंत मला आली नाही !

मग मात्र अंग असें ठणकूं लागलें—ताप भरतांना माणूस जसा अस्वस्थ होतो तसें वाटूं लागलें मला.

आम्हीं गांवापाशीं आलों.

जहागीरदारांच्या बंगल्याकडे जाण्याचा रस्ता माझ्या खोल्यावरूनच होता. माझ्या बिऱ्हाडापाशीं मी उतरूं लागलो तेव्हां ते म्हणाले,

'आमच्या बंगल्यावर चला कीं !'

'अंग फार दुखतंय् !'

'त्यावर एक उत्तम औषध आहे !'

ते बोलत असतांना मी दार उघडून खालीं उतरलोंही होतों.

लगेच तेही खालीं उतरले. 'आपण इथंच गप्पा मारीत बसूं या !' असें ते म्हणाले. तेव्हां मोठा आनंद झाला मला ! गेले तीन महिने एके ठिकाणीं खेळत असल्यामुळें आमचा चांगलाच परिचय झाला होता. त्यांना खोलीवर चहाला बोलवावें असें कितीदां तरी माझ्या मनांत आले होते. पण अजून त्यांना बोलावण्याचा धीर मात्र मला झाला नव्हता !

मी घाईघाईनें पुढें झालों. मी दिसतांच ओट्यावर बसलेल्या दादूनें झटपट उठून खोलीचें कुलूप काढलें.

जहागीरदार आंत येऊन पलंगावर लवंडले.

अंधार पडूं लागला होता म्हणून मी दिवा लावला.

जहागीरदारांकडे वळून मी म्हटलें,

'काय, चहाच घेणार ना ?'

चहा ? ' ते मोठ्याने हंसत म्हणाले. ' ही चहाची वेळ नाही महाराज !'

मी स्तब्ध राहिलों.

ते म्हणाले, ' माझं सुद्धां अंग दुखतंय् ! मॅच संपल्यावर खाल्लंही खूप ! चहानं नाहीं बरं वाटणार आतां ! '

' मग काय आणवूं ?

' बीर ! ' ते शांतपणाने म्हणाले.

त्यांचा उद्गार ऐकून मला मात्र चमत्कारिक वाटलें. माझ्या ओळखीच्या विद्यार्थ्यांपैकीं पांचपंचवीसांना बीरची चव माहीत होती आणि दोघे तिघे तर ती वारंवार पीत. पण त्यांच्या कुठल्याही मजलसींत मी सामील होत नसल्या-मुळें बीर कुठें मिळते, तिची किंमत काय असते, इत्यादि माहितीपलीकडे माझी गति कधींच गेली नव्हती.

मी कांहीच बोलत नाही असें पाहून जहागीरदार म्हणाले ' अगदींच सनातनी आहांत बुवा तुम्ही ! बीर घ्यायची नाहीं तर क्रिकेट कशाला खेळतां ? विटीदांडूनं खेळावं नि ताक प्यावं ! खूप खेळल्यावर बीरनं असा आराम वाटतो म्हणतां ! '

मला दोन वर्षांपूर्वीची आठवण झाली. आमच्या कॉलेजमधल्या वाङ्मय-मंडळाचे पाहुणे म्हणून एका बड्या साहित्यिकांना बोलाविलें होतें आम्हीं ! व्याख्यानानंतर उपहाराच्या वेळीं टेबलांवरल्या चहाकॉफीकडे तिरस्काराने पाहत ते म्हणाले होते, ' चहा पिण्यापेक्षां बीर पिणं अधिक चांगलं ! बीर ही दारू नाही; तें पेय आहे. बीरनं प्रकृति कशी ठणठणीत राहते ! '

मला मोह पडला. वाटलें–आज एकदां बीर आणावी ! जहागीरदारांचें आदरातिथ्य केल्यासारखें होईल. आणि आपणही ती थोडी घेतली म्हणून काय होतें ? आईला कोण कळवायला बसलें आहे हें ?

मी विचारांत पडलों आहे असें पाहून जहागीरदारांनी दादूला हांक मारली.

दादू दारांत येऊन उभा राहिला. त्याला तोंडाने सांगण्याचा कांही केल्या धीर होईना मला. म्हणून एका चिठ्ठीवर 'बीरच्या दोन बाटल्या' एवढीं अक्षरें मी लिहिली. ती चिठ्ठी आणि पांच रुपयांची नोट दादूच्या हातांत देत मी म्हणालों, 'जा, लवकर घेऊन ये जा !'

कुणाच्या दुकानावर जायचें आणि काय आणायचें हेंच त्याला कळलें नव्हतें !

तो जागेवरून हलला नाही.

मी बाहेर येऊन दादूच्या कानांत हळूच दुकानदाराचें नांव सांगितलें.

सापावर पाय पडावा तसा तो दचकला-आणि भूत दिसलें तर मनुष्य ज्या दृष्टीने त्याच्याकडे पाहील त्या दृष्टीने तो माझ्याकडे बघूं लागला.

मी म्हटलें 'अगदीं धांवत जा ! जहागीरदार आंत येऊन बसले आहेत-'

'तो जहागीरदार असेल, नाहीतर राजा असेल ! तुम्हांला मी दारू आणून देणार नाही !'

दादूची समजूत कशी घालायची हें मला कळेना ! बीर ही दारू नव्हे हें त्या साहित्यिकाचें मत या अडाणी गड्याच्या गळीं कसें उतरवायचें ? मी तसलें कांही सांगितलें असतें तर दादूने सरळ विचारलें असतें,

'तुम्ही ज्या बाटल्या आणायला सांगतांय् त्या दारूच्या दुकानांत कां विकतात ?'

मी हळूच म्हटलें 'दादू, या महिन्याला तुला एक रुपया जास्ती देईन. मुकाट्यानं जा नि--'

'एक सोडून शंभर रुपये दिलेत तरी--'

त्याने माझी चिठ्ठी आणि नोट फेंकून दिली.

मी संतापाने म्हटलें 'नोकरीवर ठेवलं तेव्हां मी सांगेन तें काम करायचं कबूल केलं होतंस तूं ! ही चिठ्ठी घेऊन आत्तांच्या आतां गेलास तर बरं आहे ! नाही तर--'

‘ नाहीतर माझी नोकरी जाईल. होय ना ? रामराम साहेब. असली कामं करून जगण्यापेक्षां पोटांत कांटे भरीन ! पण-- ’

त्याचा आवाज घोगरा झाला होता. डोळेही भरून आले होते.

पुढे एक शब्दही न बोलतां तो चालूं लागला.

त्याच्यासारख्या गरिबाने पावित्र्याची पूजा करावी, त्याच्यासारख्या अडाण्याने अपवित्र वाटणारी गोष्ट करण्यापेक्षां उपाशी मरणें बरें अशी श्रद्धा बाळगावी आणि माझ्यासारख्या सुखवस्तु सुशिक्षिताने—

माझी मलाच लाज वाटूं लागली. मी धांवत गेलों. दादू फाटक उघडीत होता. त्याचा हात धरून म्हटलें ‘ दादू, कुठं चाललास ? ’

‘ तुमच्या आईसाहेबांकडं ! ’

‘ माझ्या आईकडं ? ’

‘ हो ! ’

‘ कशाला ? ’

‘ त्यांच्या झाडाला कीड लागलीय् हे सांगायला ! ’

रागीट स्वराने मी उद्गारलों,

‘ मी वाटेल तें करीन ! तुला काय करायचंय् त्याच्याशीं ? ’

‘ मला काय करायचंय् ? मला माझ्या मुलाला संभाळायचंय् ! ’

‘ तुझा मुलगा तर सोलापुरांत आहे ! ’

‘ होय. साहेब ! तिथं तो कांही भलतं सलतं करायला लागला, तर त्याच्याजवळ असलेल्या म्हाताऱ्यांनीं त्याला आवरायला नको कां ? तिथं लोकांनी त्याला संभाळायला हवं ! मग इथं मी—इथं आईसाहेब तुमच्याजवळ नाहीत म्हणून मी--साहेब, मी अडाणी आहे. पण--’

त्याच्या डोळ्यांतून घळघळ पाणी वाहूं लागलें.

त्याच्या अडाणी तत्त्वज्ञानांत किती जिव्हाळा होता !

त्याच्या पाठीवरून हात फिरवीत मी म्हटलें, ' रडूं नकोस दादू. तुझी नोकरी कायम आहे ! '

' नोकरीकरितां मी रडत नाही साहेब. तुमच्याकरितां–माझा मुलगा दारूच्या गुत्त्यांत दिसला असता तर मला जेवढं दुःख झालं असतं तेवढं मघाशीं तुम्ही त्या दुकानावर जायला सांगितलंत तेव्हां झालं. साहेब, मी तुमच्या दारांतलं पायपुसणं आहे. पण––'

मला वाटलें––पायाची घाण पाय पुसण्यालाच कळते ! आयुष्यांतले खांचखळगे अडाण्यांनाच अनुभवाने ओळखतां येतात !

दादूचा हात धरून मी त्याला परत नेलें.

मी खोलीत गेल्याबरोबर जहागीरदार म्हणाले ' कुठं हो गेलां होतां ? '

' बाहेर तारवाला आला होता ! '

' तार ? कुणाची तार आली बुवा यावेळीं ? '

' आईची ! फार आजारी आहे ती ! '

मी घाईघाईने ट्रंक उघडली, खुंटाळ्यावरले कपडे काढले आणि सामानाची बांधाबांध करूं लागलों.

जहागीरदार म्हणाले ' बरं आहे ! जातों मी ! '

त्यांना पोंचवून मी परत आलों तों खोलीच्या दारांत दादू एखाद्या लहान मुलाप्रमाणे हंसत उभा होता.

# ६

## एक तळें—

पूर्वेकडे तांबडे फुटलें कीं त्याचे मनोहर प्रतिबिंब त्या तळ्याच्या जीवनांतहि उमटे. प्रभातवायूची मंद झुळूक त्याच्या शरीराला गुदगुल्या करूं लागे. त्याच्या मनाची एकएक कळी हळुहळु फुलत जाई.

तीनचार घटकांत जलाशयाचा पृष्ठभाग हांसऱ्या कमळांनी भरून जाई. त्यांतल्या कांही कांही कळया हासतां हासतां इतक्या मोहकपणाने लाजत कीं हास्यापेक्षां लज्जेंतच अधिक सौंदर्य आहे या उक्तीची प्रेक्षकाला सहज प्रचीति येई.

गांवांतली सर्व भाविक माणसें आपली पूजा यथासांग व्हावी म्हणून त्या तळ्याच्या काठीं नियमाने येत असत. बहुतेक लोक भराभरा हवीं तेवढीं कमळें खुडत. पण एखादा त्या तळ्याच्या पृष्ठभागाकडे पाहून आपलें भान विसरून जाई. त्या मनोहर दृश्याने त्याला नवीन नवीन कल्पना सुचूं लागत. आपल्यासमोर सृष्टिदेवतेने सुंदर कलाकुसर केलेला गालिचा पसरलेला आहे असा त्याला भास होई. पानाआड अस्फुट कळी दिसली कीं आईच्या कुशींत तोंड

लपविणाऱ्या लाजऱ्या बालकाची मूर्ति त्याच्या डोळ्यांसमोर उभी राही. त्याच्या डोळ्यांत नृत्य करणाऱ्या असल्या कल्पना पाहिल्या कीं तळ्याला मोठा आनंद होई. आणि दुपारीं शेजारच्या शिवालयांतली पूजा सुरू झाली, अष्टोत्तर कमळें वाहून भक्तगणाने वाजविलेल्या घंटेचा नाद कानावर पडूं लागला कीं त्या तळ्याला आपल्या आयुष्याचें सार्थक झालें असें वाटे.

* * *

एके दिवशीं तें या आनंदात मग्न असतांना एक बगळा तिथे आला.

तळ्याकडे पाहून त्याने नाक मुरडलें.

तळें त्याच्याकडे आश्चर्याने पाहूं लागलें.

बगळा वेडावाकडा चेहरा करून म्हणाला, ' छीः ! छीः ! छीः ! काय घाण पाणी आहे हें ! ' आपण तर याला चोंच लावायलासुद्धां तयार नाही बुवा !

कमळें खुडून नेणाऱ्या माणसांच्या पायांनी आपलें पाणी गढूळ झालें आहे हें तळ्याच्या लक्षांत आलें.

बगळा गंभीरपणाने उद्गारला, ' मी शेंकडों नद्या पाहिल्या आहेत, समुद्र सुद्धां पाहिला आहे. पण इतकं घाण पाणी मात्र कुठंच पाहिलं नाही ! गंगेचं पाणी कसं स्फटिकासारखं शुभ्र आहे ! आणि हें पाणी--'

तळ्याच्या पाण्याला चोंच लावून भयंकर शिसारी आल्यासारखी बगळ्याने आपली चर्या केली.

तो तळ्यापासून दूर दूर जाऊं लागला.

त्याला हांक मारून तळें म्हणालें--आज माझी चूक मला कळली. चार दिवस धीर धर. चार दिवसांत माझं पाणी गंगेइतकं शुभ्र होतं कीं नाही हें पहा ! '

* * *

कमळें न्यायला येणाऱ्या प्रत्येक मनुष्यापाशीं तळ्याने आपला चिखल उपसून टाकण्याचा हट्ट धरला. सर्वांनी त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न केला.

पण कांही तें ऐकेना ! वर्षानुवर्षें आपल्या पूजेला तळयाने दिलेलीं कमळें लक्षांत घेऊन सारी भाविक मंडळी गाळ उपसूं लागली.

*　　　*　　　*

तळयांत चिखलाचा लवलेश सुद्धां उरला नाही.

आपलें पाणी गंगेइतकें स्वच्छ झालें या आनंदांत तळें दंग झालें.

पण लवकरच कमळांच्या सर्व वेली सुकून गेल्या. तळयांत एकही कमळ फुलेना.

तळयाला आपलें जीवन अगदीं रूक्ष, नीरस वाटूं लागलें.

विपुल मिळणारे मासे गिळतां गिळतां बगळा म्हणूं लागला ' किती स्वच्छ पाणी आहे हें ! जणुं कांहीं गंगाजळच ! '

७

# स्वर्ग आणि नरक !—

माझ्या जिभेवर "नको बुवा!" हे शद्ब अगदी उभे राहिले होते, पण माणसाच्या मनाचें त्याच्या जिभेशीं नेहमीच सख्य असतें असें कांही नाही. माझें मन म्हणत होतें— हो म्हण! जीभ कुरकुरत होती— मनाची नाही ती नाही, पण जनाची तरी लाज धर थोडी! दिवसाढवळ्या वेश्या राहातात अशा ठिकाणीं जायचें! छीः !

या द्वंद्वयुद्धांत जिभेचाच जय झाला असता, पण ऐन वेळीं माझ्यांतलें लेखकाचें रक्त वर उसळून मनाच्या मदतीला धावलें. तें म्हणत होतें—घराच्या चार भिंतींत कोंडून घेऊन कांही कुणाला जग दिसत नाही! अनायासें ही संधि आली आहे, चार चांगली मंडळी तुझ्याबरोबर येणार आहेत, मग तिथे जायला तुला काय हरकत आहे!

स्नेह्यांच्या बरोबर जाण्याकरिता मी कपडे चढविले. शुक्रवार पेठेंतला एक वाडा त्यांच्या मालकीचा झाला होता. कित्येक वर्षें या वाड्याचें प्रकरण कोर्टांत भिजत पडले होतें. त्या वादाचा निकाल नुकताच माझ्या स्नेह्यांच्या बाजूने झाला होता. पूर्वीच्या मालकाप्रमाणें तो वाडा वेश्यांकडे ठेवून आपलें उत्पन्न वाढविण्याची त्यांची इच्छा नव्हती. आतासुद्धा त्यांनी एका एंजिनिअरला बरोबर घेतलें होतें तें यासाठीच! सर्व मित्रांच्या सल्ल्याने आणि एंजिनिअरच्या मदतीने कुलीन कुटुंबांना राहाण्याला सोयिस्कर होईल अशा रीतीने वाडा दुरुस्त करण्याची योजना ते आखणार होते.

मोटारींतून जायला आम्हांला पांचसात मिनिटेंच लागलीं; पण तेवढ्यांत त्या वाड्याची, त्यांतल्या शरीरविक्रय करणाऱ्या दुर्दैवी स्त्रियांची, त्यांच्या खोल्यांची आणि त्यांतल्या शृंगारिक साहित्याचीं कितीतरी कल्पनाचित्रें माझ्या डोळ्यांपुढे झर्कन् येऊन गेलीं. एका खोलींतल्या पलंगासमोर लावलेलें एक चित्रहि मला दिसलें. उर्वशी आकाशांत उडून जात आहे, पुरूरव्याने ओढलेला पदर अंगावरून खाली घसरल्यामुळें ती लज्जेने......

आम्हीहि लज्जेनेच मोटारींतून खाली उतरलों. वाडा अगदी हमरस्त्याला होता. त्यामुळे त्याच्यासमोर मोटार उभी राहिलेली दिसतांच दहावीस माणसें आमच्याभोवती गोळा झालीं. त्या सर्वांच्या डोळ्यांतल्या आश्चर्याचा एकच अर्थ होता—भर दिवसां वेश्या राहात असलेल्या वाड्यापुढे मोटारीतून उतरणारीं हीं माणसें मोठीं निर्लज्ज असलीं पाहिजेत! त्या लोकांच्या नजरेला नजर देण्याचा मला धीर झाला नाहीं. पण मनांत मात्र मी त्यांना हसलों. मला वाटलें, मनुष्याचें मन किती रूढिप्रिय असतें! आमच्याकडे टवकारून पाहाणाऱ्या या माणसांना आम्ही दुसऱ्या कांही कामाकरिता येथे आलों असूं अशी शंकासुद्धा येऊं नये ही किती नवलाची गोष्ट आहे!

वाडयाच्या दर्शनी दरवाजांतून आम्हाला वाकूनच प्रवेश करावा लागला. लगेच अंधाराने भरलेल्या एका अरुंद बोळकंडींतून आम्ही पुढे जाऊं लागलों. वेश्येचें जीवन किती रहस्यमय असतें याची पूर्वसूचना देण्याकरिताच तर ही वाट मुद्दाम तयार केली नाही ना, अशी माझ्या मनांत शंका येऊन गेली. माझ्यापुढे असलेले एक स्नेही उद्गारले, "वाकडं पाऊल पडणं, ही म्हण कशी प्रचारांत आली हें आता कळलं मला! असल्या अंधाऱ्या वाटेंत मुरगळून नाही तर ठेच लागून पाऊल वाकडं झालं नाही तरच नवल!"

ते पुढे कांहीच बोलले नाहीत. त्यांच्या कोटीमुळे उत्पन्न झालेलें हसणें विरतें न विरतें तोंच आम्ही मागल्या चौकांत आलों. तिथे जरा प्रकाश होता. तो पाहून मोठें बरें वाटलें मनाला.

वाडयाची व्यवस्था एका पंजाबी मनुष्याकडे होती. दिवसा एका किराण्या मालाच्या दुकानांत भागीदार म्हणून ती थोडेंफार काम करी. आम्ही येणार हें त्याला आगाऊ कळविलें असल्यामुळे स्वारी आमच्या स्वागताकरिता तयार होती. आपल्या काळ्याभोर दाढीवरून हात फिरवीत त्याने आम्हांला वाडा दाखवायला सुरवात केली.

घोड्याच्या पागेचीच कळा आली होती त्या वाड्याला. खाली, वर, जिकडे पाहावें तिकडे खोल्याच खोल्या होत्या. तळमजल्यावरच्या तीन-चार खोल्या उघड्या होत्या, त्यांच्या दारांतून मीं दबकत दबकत डोकावून पाहिलें. मला वाटलें, कबुतरांची खुराडींसुद्धा यांपेक्षां बरीं असतील! गिडु दरवाजे, निम्माशिम्मा चुना निखळून पडल्यामुळे महारोगाने विद्रूप झालेल्या अंगासारख्या दिसणाऱ्या भिंती, जमिनीवर पडलेला केरकचरा, आंतले भकास दारिद्र्य—वेश्या या शब्दाशीं संलग्न असलेल्या सौंदर्याचा लवलेशसुद्धा मला एकाहि खोलींत दिसला नाही. एका खोलींत एक बाई

जेवायला बसली होती. दुपारी तीन वाजतां जेवण ! मीं आमच्या पंजाबी मार्गदर्शकाकडे आश्चर्याने पाहिलें. तो हसून हळूच म्हणाला—

" साहेब, हें सारं जग निराळं आहे ! तुमच्या घड्याळांचा इथे कांही उपयोग नाही. रात्रीं बाराबारा वाजेपर्यंत जागावं तेव्हा कुठं या बायांना दोनतीन गिऱ्हाइकं मिळतात ! झोप येऊं नये म्हणून या आधी खूप चहा पितात. तसंच गिऱ्हाईक मिळालं तर त्याच्याबरोबर दारूहि पितात. तुमच्या घड्याळांत पहाटेचे तीन वाजतात तेव्हा यांच्या घड्याळांत रात्रींच्या दहाचे ठोके पडतात ! तीन वाजतां निजल्यावर नऊ दहाच्या आधी आम्ही तरी उठूं का ? दहाला उठल्यावर जेवणाला दोन नाहीतर तीन वाजायचेच ! "

मॅजिक-लँटर्नच्या साहाय्याने खेडवळांना माहिती देणाऱ्या एखाद्या प्रचारकाप्रमाणे तो पंजाबी मनुष्य शांतपणाने हें बोलला. पण तो थांबतांच माझ्या अंगावर एकदम शहारे आले !

दुसऱ्या एका खोलींत एक काळीकुट्ट प्रौढ बाई तोंडाला रंग लावीत बसली होती. आमच्या मार्गदर्शकाने तिला प्रश्न केला—" काय मिमा, इतक्या लवकरशी रंगायला लागलीस ? "

ती बाई गप्प बसली असती तर पंजाब्याच्या या प्रश्नाचेंच मला आश्चर्य वाटलें असतें. पण नाट्यप्रयोगाकरिता रंगणाऱ्या नटीप्रमाणे तिने हसतहसत त्याच्याकडे पाहिलें आणि उत्तर दिलें,

" काय करायचं बाबा ! आमच्या धंद्यांतसुद्धा कांपिटिशन आहे ! काल एक चांगलं गिऱ्हाईक माझ्या दारांतून परत गेलं. ती पलीकडली तारा आहे ना, तिनं पळविलं त्याला ! मी तिच्यासारखी तरणी होतें तेव्हा —" मिमाने डोळे मिचकावून मोठें विकट हास्य केलें. तें ऐकून

सापावर पाय पडला की माणसाच्या अंगावर जसा विचित्र काटा उभा राहातो, तशी माझ्या मनाची स्थिति झाली.

चित्रपटांतला राजवाडा पाहायला स्टुडिओंत गेलें की मुळांतलें चित्रविचित्र बेढब सेटिंग पाहून नवख्या मनुष्याचें मन गोंधळून जातें. मला वाटलें, वेश्याजीवनहि तसेंच आहे!

पाहिलें तेवढ्यानेंच माझें मन उबगून गेलें. वाड्याचे मालक असलेले माझे स्नेही एंजिनियरांच्याबरोबर मोडतोडीची बाटाघाट करीत होते. पण त्यांत कांही केल्या माझें मन रमेना. इतक्यांत आमच्या अंगावरून एक सतराअठरा वर्षांची पोरगी जाऊं लागली. पंजाब्याने "छोकरी" म्हणून हटकतांच ती जागच्या जागीं थांबली. तिचे डोळे एकदम एखाद्या सशासारखे केविलवाणे दिसूं लागले. पंजाबी तिला म्हणाला, "कालची चार आणे बाकी राहिलीय्! आज दिवेलागणीला आठ आणे माझ्या हातांत पडले तर ठीक आहे; नाहीतर खोलीला कुलूप ठोकीन."

पोलीसाने दरडावून चोराला कांहीतरी सांगावें तसें तो हें बोलला. ती पोरगी डोळे पुशीत निघून गेली. माझें कुतूहल अगदी अनावर झालें.

मी विचारलें, "काय भानगड आहे ही?"

"भानगड कसली, वसुली आहे ही!"

"वसुली?"

"हं! भाडं दररोज वसूल करावं लागतं! तळमजला चार आणे, वरचा मजला सहा आणे, मधली मोठी खोली—"जणुं कांही आपण एखाद्या नाटक कंपनीचे मॅनेजर आहों अशा आविर्भावाने स्वारी मला निरनिराळ्या खोल्यांचे दर सांगत होती.

"एकदम महिन्याचं भाडं कां घेत नाही?" मीं प्रश्न केला.

" महिन्याचं ! " असा उद्गार काढून तो पंजाबी एवढ्या मोठ्याने हसला की माझा प्रश्न अगदी मूर्खपणाचा होता असें माझें मलाच वाटूं लागलें.

पावसाच्या मोठया सरीप्रमाणे त्याचें तें हसणें होतें.

हसूं ओसरल्यावर तो उद्गारला,

" साहेब, हें सारं जग निराळं आहे म्हणून मीं मघाशी तुम्हांला सांगितलं ना ? आम्ही खुशाल महिन्याचं भाडं घेऊं, पण या बायांचा काय नेम आहे ? महिन्याकाठी यांच्यापाशीं फुटकी कवडीसुद्धा शिल्लक नसते नी या केव्हां हातावर तुरी देऊन पळून जातील....आता ही पोरगी पाहिलीत ना ? तशी कांही वाईट नाही दिसायला ! उद्या रात्रींचा रुपाया मिळवील; पण धंद्यांत मुरली नाही अजून. तिच्यामागं भाड्याचा तगादा लावला नाही, तर मालकाचे पैसे कधींच वसूल व्हायचे नाहीत ! "

बाकीची मंडळी एंजिनिअरांच्याबरोबर चर्चा करीत उभी राहिली. मी मात्र त्या पंजाबी माणसाच्या मागून जिना चढून दुसऱ्या मजल्यावर गेलों. चढतांना त्या मुलीविषयींच्या विचारांनीं मन अगदी भारावून गेलें. तिचे ते सशासारखे दिसणारे केविलवाणे डोळे, ती निष्पाप मुद्रा—कोणत्या संकटात सापडून बिचारीने या खाईत उडी टाकली असेल ? प्रेमळ पत्नी म्हणून एखाद्या पुरुषाचें आयुष्य पूर्णपणें सुखी करण्याची पात्रता तिच्यांत नसेलच का ? छेः ! ते सशासारखे डोळे—

मी विचारलें, " कुठल्या जातीची मुलगी आहे ही ? "

तो पंजाबी मिस्किलपणाने हंसला. मला मनांतल्या मनांत शरमल्या-सारखें झालें. मी त्या मुलीची चौकशी कांही विशेष हेतूने करीत आहे असा त्याचा ग्रह झाला असावा !

मी गप्प बसलों. पण जिना चढून वर गेल्यावर तो म्हणाला, "साहेब, या जगांत जातपात सब झूट आहे! मधाची ती भिमा महारीण आहे. आता तुम्हीं पाहिलीत ती छोकरी—मराठ्याची आहे ती! नी या खोलीत राहाणारी बाई तर चांगली पांढरपेशाची असावी!"

वरच्या मजल्यावरल्या खोल्या खालच्यापेक्षा थोड्या मोठ्या होत्या. त्यांतल्या मधल्या खोलीकडे बोट दाखवीत पंजाब्याने शेवटचें वाक्य उच्चारलें होतें. त्याच्या या उद्गारांनी एरवीं मी चकित झालों असतों, पण माझ्या मनांत त्याचें मधाचेंच वाक्य घोळत होतें— "या जगांत जातपात सब झूट आहे."

या जगात—या निराळ्या जगांत—

त्याचें म्हणणें अगदी बरोबर आहे असें मला वाटलें. इथलें हें जग आपल्या जगाहून अगदी निराळें आहे. आपल्या जगांत महारांच्या आणि पांढरपेशांच्या बायका हळदीकुंकवालासुद्धा एके ठिकाणीं येणार नाहींत. पण इथे या जगांत—

हें जग विचित्र आहे, घाणीने भरलेलें आहे. पण तें खोटें आहे का? त्या पंजाब्याने सांगितलेल्या गोष्टींत अवाक्षरसुद्धा खोटे नव्हतें.

त्या मधल्या खोलीचें दार उघडेंच होतें. आंत कोणीच नव्हतें. ती खोली इतर खोल्यांपेक्षां अधिक नीटनेटकी दिसत होती. आंत जाऊन सर्व खोली न्याहाळून पाहण्याची जिज्ञासा माझ्या मनांत उत्पन्न झाली. त्या खोलीची मालकीण आंत असती तर बहुधा मला एवढा धीर झाला नसता! पण—मनांत विचार आला, एखाद्या गोष्टींत वेश्येच्या खोलीचें वर्णन करण्याचा प्रसंग आला तर आपल्या हातून अनेक चुका व्हायच्या! आपल्या टीकाकारांत अनेक तज्ज्ञ माणसें आहेत! ती आपलें अज्ञान चव्हाट्यावर आणल्याशिवाय राहायचीं नाहीत. तेव्हा—

आत जाऊन मी खोलीतील वस्तून् वस्तु निरखून पाहूं लागलों. त्याचा हेतु लेखनांत आपलें अज्ञान प्रकट होऊं नये हा होता की वेश्येच्या खोलीविषयींची विकृत जिज्ञासा तृप्त करून घेण्याचा होता हें चित्रगुप्तालाच ठाऊक!

या खोलींत राहणारी बाई पांढरपेशा वर्गांतली असली पाहिजे हें उघड दिसत होतें. खोलींतल्या दोन भिंतींवर कितीतरी सुंदर तसबिरी आणि चित्रें लावलेली होतीं. मात्र राम-पंचायतनाशेजारीं कुठल्याशा चित्रपटांतल्या अर्धनग्न नायिकेचा फोटो लावलेला पाहून मला हसूं आल्यावांचून राहिलें नाही. तसबिरीखालच्या कोपऱ्यांत एका लहानशा चौरंगावर दोनतीन देवांच्या मूर्ति ठेवलेल्या दिसत होत्या. मीं जवळ जाऊन पाहिलें, देवांची पूजा नुकतीच झाली असावी. त्यांच्यावरलीं फुलें किती ताजीं दिसत होतीं. त्या फुलांतला टपोरा गुलाब पाहून तर मला आश्चर्यच वाटलें. तसलें फूल मी कांही देवाला वाहिलें नसतें. कोटाला लटकावल्यावर तें कसें छान दिसलें असतें!

मी दुसऱ्या बाजूला पाहिलें. तिथला पलंग चांगला सागवानी लाकडाचा होता. मच्छरदाणी वर टाकली असल्यामुळे माझें लक्ष पलंगावर पसरलेल्या गादीकडे गेलें. कुणाचेंहि लक्ष वेधून घेतील अशा दोन गोष्टी तिथे होत्या. एक पांढरेंशुभ्र गुबगुबीत असें मांजराचें पिल्लू आणि दुसरी त्याच्याजवळच पडलेला कसल्यातरी मासिकाचा अंक!

मी पुढे होऊन त्या मांजराच्या दुधासारख्या पांढऱ्याशुभ्र अंगावरून हात फिरविण्याचा प्रयत्न केला; पण परक्या मनुष्याचा स्पर्श त्याला नापसंत असावा असें दिसलें. माझा हात लागतांच टुणकन उडी मारून तें निघून गेलें.

वाचणाऱ्याने मासिक वाचतांवाचतां मिटून ठेवलें असावें! खुणेदाखल ठेवलेला डोक्यांतला आकडा एका पानांतून डोकावून पाहत होता. मी तें

पान उघडलें. आंतल्या मजकुरावरून नजर फिरवितांच मी स्तिमित झालों. माझीच गोष्ट होती ती—"समाधीवरलीं फुलें."

खाली मंडळी आपली वाट पाहात असतील असें त्या पंजाब्यानें सुचविलें म्हणून बरें; नाहीतर या खोलीच्या मालकिणीविषयी तर्कवितर्क करीत मी तिथेच किती वेळ उभा राहिलें असतों कुणाला ठाऊक!

आम्ही जिन्याच्या तोंडाशीं आलों तों खालून कुणीतरी बाई वर येत होती. किंचित् मागे होऊन आम्हीं तिला वाट करून दिली. माझ्या अंगा-करून ती जाऊं लागली तेव्हा मला एकदम एक विचित्र भास झाला. या बाईला आपण कुठेतरी पाहिलेलें आहे. कुठे बरें!

आठवण करीत मी दोन पायऱ्या उतरलों. आपल्याला कांहीतरी भलताच भास होत असावा असें वाटून मीं मध्येच मागे वळून पाहिलें. ती बाईहि जिन्याकडे पाहात उभी राहिली होती. मला ती ओळखीची वाटली. तिनेंहि मला ओळखलें असेल का?

खालच्या मंडळींची आठवण होऊन मी झप्झप् पायऱ्या उतरूं लागलों. मनांत आलें—इथल्या एखाद्या बाईशीं माझी ओळख आहे असा सुगावा आपल्या स्नेहीमंडळींना लागला तर—छेः! चार चौघांत मान वर करून पाहायची सोय नाही उरणार आपल्याला!

शरीराबरोबर माणसाचे मनहि धावूं लागतें की काय कुणाला ठाऊक! मी जवळजवळ धावतच खालच्या चौकांत आलों. तोंपर्यंत माझें मन वीस वर्षांपूर्वीच्या काळांत जाऊन पोचलें होतें. माझ्या डोळ्यांपुढे माझी कोकणां-तली बालमैत्रीण शांता उभी राहिली. मी कोकणांत मामीच्या घरीं वर्षभरच होतों. पण आता पाहिलेल्या बाईचा चेहरा आणि शांताचें मुग्ध मुखमंडल—दोन्हींत कांहीतरी विलक्षण साम्य आहे असें मला वाटूं लागलें. मनांतल्या मनांत अगदी अस्वस्थ होऊन गेलो मी!

आम्ही जायला निघालों; इतक्यांत जिन्यावरून कुणीतरी खाली उतरत आहे असें दिसलें. आम्ही चार पावलें पुढे गेलों न गेलों इतक्यांत माझ्या-मागून एक आवाज आला--

" ओळखलं नाहींत मला ? "

शांताचाच स्वर होता तो ! लहानपणीं लपंडाव खेळतांना ' साई सुट्यो ' म्हणून ती ओरडत असे तेव्हाचा तिचा स्वर मला आठवला. शांताच्या स्वरांत बदल झाला नव्हता; पण तिच्या जीवनांत ?

त्या वेळीं शांता एक निष्पाप कुमारिका होती. आणि आंज !-- आज ती वेश्या झाली आहे !

शांताने आपणहून या चिखलांत उडी टाकली असेल ?

मी तिच्याकडे नुसता पाहात उभा राहिलों. माझे स्नेहीहि गोंधळून गेले होते.

शांता हसून म्हणाली, " असे लाजतां काय ? तुमची बालमैत्रीण शांता तुम्हाला चहाला बोलवायला आली आहे ! "

स्नेह्यांकडे पाहात मी म्हटलें, " माझ्याबरोबर ही मंडळी आहेत ! "

" असेनात ! त्यांना पुरेल इतका चहा माझ्या डब्यांत शिल्लक आहे. चला-- "

आमच्यापुढे शांताने चहाचे पेले आणून ठेवीपर्यंत कुणींच कांही बोललें नाही. केव्हा एकदा या विचित्र पाहुणचारांतून आपण पार पडतों असें सर्वांना झालें होतें.

आम्ही चहा घेऊं लागलों तेव्हा शांता माझ्यासमोर बसून म्हणाली, " मला इथं पाहून तुला नवल वाटलं असेल मोठं ! नाहीं ! !

मी नुसती मान हालविली. तिच्या एकवचनांत बालपणांतलें निर्मल प्रेम प्रतिबिंबित झालें होतें.

शांता बोलूं लागली—

" मी तुझ्या ओळखीची ! तुझ्याबरोबर खेळलीसवरलेली म्हणून तुला माझ्याबद्दल वाईट वाटत असेल ! पण इथल्या पन्नास बायकांपैकी कमीत कमी चाळीस तरी माझ्यासारख्याच या नरकांत आल्या आहेत. डोंगराच्या माथ्यावरून दगड सुटला की तो थेट दरी गाठतो ! होय ना ! बायकांच्या आयुष्याची तीच गत होते. एकदा घर सुटलं की–

" तूं घर कां सोडलंस ? " मोठा धीर करून मीं प्रश्न विचारला.

" कां ! " एवढाच शब्द उच्चारून ती क्षणभर थांबली. चारपांच परक्या माणसांसमोर आपलें मन उघडें करावें की करूं नये या विचारांत ती पडली असावी ! किंचित् थांबून ती म्हणाली—

" तूं मोठा लेखक झाला आहेस. माझं खरंखुरं चरित्र लिहून दिलं तर तें सुधारून छापशील ? "

मी मान डोलावली.

शांता हसून म्हणाली,

" तें चरित्र पुरे व्हायला खूब दिवस लागतील अजून. तेव्हां—

" तुला काय बोलायचं तें मोकळेपणानं बोल. हे सारे माझे स्नेही आहेत. "

" आज नवे मालक वाडा बघायला येणार आहेत. नि ते वाडा दुरुस्त करून आमच्यासारख्या बायांना इथून काढून लावणार आहेत, असं जेव्हा सकाळीं कानांवर आलं तेव्हा मला काय वाटलं तें सांगूं ? एका वाड्याच्या मालकानं असल्या बायकांना इथून हाकलून दिलं म्हणून काय त्यांची सुधारणा होणार आहे ? त्या दुसऱ्या वाड्यांत जाऊन राहतील ! असा एक एक वाडा दुरुस्त करून काय उपयोग ? बायकांना या नरकांत

घालणाऱ्या चाली आधी दुरुस्त करा, कायदे दुरुस्त करा, पुरुषांचं मनें दुरुस्त करा– "

आपला चढलेला स्वर किंचित् खालवून शांता म्हणाली,

" इथल्या बायकांचं जिणं किसळवाणं असतं ! त्यांनासुद्धा तें पटतं. पण कुणी नवऱ्याच्या जाचाला कंटाळतात, कुणी भुकेल्या डोळ्यांनीं जगाकडे पाहतां पाहतां मोहाला बळी पडतात, कुणी आपल्या पायांवर उभ्या राहाण्याकरिता घर सोडतात ! पण घराबाहेरसुद्धा जिकडेतिकडे खड्डे पसरलेले असतात. चांगल्या चांगल्या बायकांनासुद्धा शेवटीं या खड्ड्यांत पडावं लागतं ! "

आमच्या पेल्यांतला चहा संपलेला पाहून ती म्हणाली, " काय करायचंय् हें सारं सांगून ! तुमच्यासारख्यांना कंटाळा येईल हें पुराण ऐकून ! बाजारांत येऊन बसलेल्या बायकांनासुद्धा खऱ्या प्रेमाची भूक असते, नीतीनं वागण्याची इच्छा असते, हें खरंसुद्धा वाटणार नाही तुम्हांला ! जिवाला जीव देणारं एक माणूस मिळालं तरी––"

दारांत कुणीतरी येऊन उभें राहिल्यासारखें वाटलें. मीं वळून पाहिलें. मघाशी तळमजल्यावर पाहिलेली ती सतरा अठरा वर्षांची मुलगी !

शांता उठली आणि बाहेर गेली. त्या दोघी कांहीतरी कुजबुजत होत्या. आंत येऊन शांताने पलंगाखालची आपली पेटी उघडली आणि एक अधेली काढून ती त्या मुलीच्या हातांत नेऊन दिली.

इतरांना वाटलें, त्या पोरीपाशी खायला पैसुद्धा नसेल, तेव्हा शेजार धर्म म्हणून शांताने तिला आठ आणे दिले असावेत ! पण मला मात्र त्या आठ आण्यांचा अर्थ पूर्णपणें कळला. शांता त्या मुलीला मदत करीत होती हें खरें; पण ती मदत तिचें पाऊल या नरकांतून बाहेर पडावें म्हणून नव्हती, तर तें या नरकांतच स्थिर व्हावें म्हणून !

शांता आंत आलेली दिसतांच आम्ही सर्व जायला उठलों. इत: मधाचें तें पांढरेंशुभ्र मांजराचें पिल्लू तिच्याजवळ येऊन पायांना अंग घासूं लागलें. तिने त्याला उचलून घेतलें आणि एखाद्या प्रेमळ आईप्रमाणें त्याला कुरवाळीत ती म्हणाली,

"माझ्या मनीला विसरलें नाही हं मी."

लगेच आमच्याकडे पाहून हसत ती उद्गारली, "तुमच्या चहांत दूध कमी होतं, होय ना? त्याचं कारण ही स्वारी!"

देवाजवळच्या कोपऱ्यांतून तिने एक वाटी उचलली आणि तिच्यांत भरपूर दूध ओतलें. तें पिल्लू मोठा गमतीदार आवाज करीत दूध पिऊं लागलें. शांताच्या चेहऱ्यावर आनंदाची छटा चमकून गेली. माझ्याकडे वळून ती म्हणाली, "हें पिल्लूं मोठ्या प्रयासानं मिळविलं आहे मीं! कसं कापसासारखं पांढरंशुभ्र आहे! दुसऱ्या रंगाचा एकसुद्धा ठिपका नाही हं त्याच्या अंगावर!" त्या पोराच्या पांढऱ्याशुभ्र रंगाविषयी तिला किती अभिमान वाटत होता.

बाकीची मंडळी मानेनेच शांताचा निरोप घेऊन बाहेर गेली. मला कांहीतरी बोलणें प्राप्तच होतें. मी म्हटलें, "शांता, तुझा बालमित्र म्हणून मी बोलतोंय्. क्षमा कर मला. या नरकांतून तूं बाहेर पडलीस तर—"

"या नरकांत मी खुषीनं राहिलें आहे!"

"खुषीनं?"

"हो!"

ती धावतच पलंगाकडे गेली. टेबलाखालच्या पेटींतून तिने एक वही काढली. त्या वहीचीं तीनचार पानें घाईघाईने फाडलीं आणि तीं पानें माझ्या हातांत देत ती म्हणाली—

हें सावकाश घरीं वाच आणि मग मला स्वर्गांत न्यायला विमान यावंसं वाटलं तर अगत्य ये!"

*          *          *

शांताने दिलेलीं तीं पानें पुनःपुन्हा वाचतांना माझ्या डोळ्यांपुढें एकच वाक्य नाचत होतें. त्या अक्षरांतून जणूं कांहीं अग्निज्वाला प्रगट होत होत्या—

"या जगांत जोंपर्यंत एकाचा स्वर्ग शंभरांना नरकांत ढकलीत आहे तोंपर्यंत नरकांत राहाण्यांतच माणुसकी आहे!"

शांताच्या कागदांत एवढाच मजकूर होता—

## "एका मुलीची कर्मकथा"

ही मुलगी चांगली नव्हती आणि वाईटहि नव्हती. ती एक माणूस होती. लहानपणींच तिची आई वारली. बापाने तिला मराठी चार यत्ता कशाबशा शिकविल्या. पुढचें शिक्षण करायला त्याच्यापाशीं पैसे नव्हते. या मुलीच्या धाकट्या भावाचें शिक्षण त्याला करावयाचें होतें. त्याची म्हातारपणची काठी होती ती!

पंधराव्या-सोळाव्या वर्षीं या मुलीचें एखाद्या बऱ्यावाईट गरीब मनुष्याबरोबर सहज लग्न झालें असतें. पण बापाला श्रीमंत जावई हवा होता. मुलीच्या रूपाला भुलून कुणीतरी मातबर मनुष्य तिला करून घेईल अशी त्याला आशा होती. पण पुष्कळशा आशा वांझ असतात हें त्याच्या कधीच लक्षांत आलें नाही.

मुलगी वीसबावीस वर्षांची झाली तरी बाप श्रीमंत जावयाची वाट पाहातच होता. घरच्या कामाने शिणून जाणाऱ्या त्या मुलीच्या शरिराला, नि घाण्याला जुंपलेल्या बैलाप्रमाणे कंटाळून गेलेल्या तिच्या मनाला कसलाच विरंगुळा नव्हता. याचा फायदा शेजारच्या एका लंपट तरुणाने घेतला.

तिला दिवस जातांच त्या पशूने कानांवर हात ठेवले. बापाने 'कुठंतरी जाऊन जीव दे' म्हणून तिला सल्ला दिला. जीव द्यायला ती घराबाहेर पडली. पण तिला लवकरच एक गोष्ट कळून चुकली—स्वतःच्या जिवापेक्षा मनुष्याला अधिक प्रिय असें जगांत कांहीच नाही.

योगायोगाने तिची चाळिशीच्या घरांत आलेल्या एका सुशिक्षित मनुष्याशीं गाठ पडली. त्याने मुंबईला नेऊन ती आई होणार नाही अशी व्यवस्था केली. तिला आनंद झाला आणि दुःखहि झालें. तें जन्माला न आलेलें मूल कितीतरी दिवस तिच्या स्वप्नांत एकसारखें येत होतें !

एवढ्या मोठ्या वयाचा हा सुशिक्षित मनुष्य थोरल्या भावाप्रमाणे आपल्याशी वागेल अशी तिची कल्पना होती. पण जगांत तरुण स्त्रीला भाऊ मिळणें कठीण आहे हा अनुभव तिला लवकरच आला. आपल्याच वयाच्या बाईशीं प्रेमविवाह करणारा हा सुशिक्षित बायको म्हातारी झाली म्हणून आता तिच्यावर नाखूष झाला होता. त्याच्या रंगेलपणाला या मुलीला बळी पडावें लागलें. तो तिला म्हणे—"तुझ्या सहवासांत मला अगदी स्वर्गांत असल्या-सारखं वाटतं!"

एवढ्यावरच ही विटंबना थांबली असती तर या मुलीची जगांत कशावर तरी श्रद्धा राहिली असती. या सुशिक्षित मनुष्याबरोबर घालवि दोनतीन वर्षांत तिच्या बुद्धीची पुष्कळच वाढ झाली. तिला चांगलींच पुस्तकें वाचायला मिळालीं. पण तिची खऱ्या प्रेमाची तहान मात्र भागली नाही.

तीन वर्षांनी तिच्या नव्या मालकाने तिचा लिलाव मांडला. कसलेंसें काम साधण्याकरिता एका मोठ्या मनुष्याकडे त्याने या पाठविलें. त्या मोठ्या मनुष्याच्या घरीं तिला एक गोष्ट पुरी पुरी

चुकली—पुरुषांत अजून माणुसकी यायची आहे. सुंदर स्त्री ही त्यांच्या दृष्टीने नुसती मेवामिठाई आहे!

तिथें पुन्हा या मुलीला दिवस गेले. आपल्या पाठीमागे तिची जन्माची ब्याद लागूं नये म्हणून तिच्यावर भलताच आळ घालून त्या बड्या मनुष्याने तिला आपल्या घरांतून हाकलून दिलें. ती रस्त्यावर अनाथ होऊन पडली. तिची एका पुरूषावर खरेंखुरें जिवाभावाचें प्रेम करण्याची इच्छा होती. पण जगाच्या बाजारांत सौंदर्याला किंमत आहे; प्रेमाला नाही, मनाला नाही. या जगांत जोंपर्यंत एकाचा स्वर्ग शंभरांना नरकात ढकलीत आहे तोंपर्यंत नरकात राहाण्यांतच माणुसकी आहे असें तिने ठरविलें. नाहीतरी ती काय करणार होती? आपल्या कॉलेजांत असलेल्या भावाला ती नुसती भेटायला गेली; पण तो तिचें तोंड पाहायलासुद्धा तयार झाला नाही.

शेवटीं एका प्रौढ वेश्येने या मुलीला आश्रय दिला. तिला मुलगा झाला. तिच्या दुर्दैवानें तो फार दिवस जगला नाही. तिला आश्रय देणाऱ्या त्या वेश्येची मिळकत अगदीं कमी झाली होती. तिच्यापाशी कांही मोठीशी शिल्लक नव्हती. तिचें कुटुंबहि मोठें होतें. आपल्यावर प्रेम करणाऱ्या त्या बाईला मदत करण्याकरिता जगावें असें त्या मुलीला वाटूं लागलें. अनेक लोकांनी आपल्या सुखाकरिता तुडविलेली, लाथाडलेली, खाली ढकलून दिलेली ती मुलगी वेश्या झाली.

या नरकांतल्या अनुभवांनी तिचें उरलें सुरलेलें मन मरून गेलें. ा असो, नाहीतर घराबाहेर असो, गुलाम म्हणून राहिल्याशिवाय, स्वतःची बना करून घेतल्याशिवाय स्त्रीला अजून जगतां येत नाही अशी तिची ी झाली. तिच्या साऱ्या कल्पना बदलल्या. जनावराप्रमाणें जगणें आणि ा जगण्यांतच स्वर्गसुख मानणें हेंच जगाचें सध्याचें तत्वज्ञान आहे तीहि एक जनावर झाली.

८

# कुंडींतलीं फुलझाडें!—

प्रिय दादा,　　　　　　　　　　　　　　　　　　　बेळगांव,

सप्रेम नमस्कार,　　　　　　　　　　　　　　　　२७-८-३९.

गेले दोन दिवस तुला पत्र लिहीन लिहीन असं स्वतःशीं घोकतेय ! पण टेबलापाशीं येऊन नोटपेपर समोर ठेऊन बसलें तरी लिहिण्याकडे लक्षच लागत नाहीं बघ !

हें वाचून तूं स्वतःशींच कसा हसशील नी मनांत कायकाय म्हणशील तें मला ठाऊक आहे ! पुढचा मजकूर न वाचतांच तूं वहिनीला म्हणशील, 'बायकांचं मन म्हणजे नुसतं पाणी. ज्यांत मिसळायचं त्याच्या रंगानं रंगून जायचं एवढं काय तें ठाऊक असतं त्यांना ! सासरीं जायच्या वेळीं या ताईटलीच्या गंगायमुनांना नुसता पूर आला होता; पण लग्न होऊन दोन

वर्षं झालीं नाहीत तोंच मावाला पत्र लिहायचा कंटाळा येऊं लागला हिला !'

असली कांहीतरी टीका तूं करशील म्हणून आधीच सांगतें—पत्र लिहायला माझं मन घेईना याचं कारण मी एकसारखी त्यांच्या नांवाची जपमाळ घेऊन बसलें आहे हें मुळीच नाही. आता जपाची काय जरूरी आहे ? पुढच्या पंधरवाड्यांत निघतों असं स्वारींचं परवाच पत्र आलंय् ! मागच्याच महिन्यांत येणार होते ते. पण वरचेवर परदेशीं जाणं कांही शक्य नाही म्हणून पाहण्यासारखीं सारीं स्थळं पाहून घेणार आहेत ते ! स्थळं म्हणण्यापेक्षां केसीसच म्हणायला हवं ! त्यांचा स्वभाव ठाऊक आहे ना तुला ? कुठं एखादी विलक्षण केस दिसली तर तिथंच ते पंधरा दिवस राहातील.

पत्राला उशीर होण्याचं खरं कारण तुला सांगूं ? तीनचार दिवस माझी दाढ एकसारखी दुखतेंय ! हें वाचून तूं हसायला लागशील ! पण मला वाटतं, देवानं माणसाला दुसरं कुठलंहि दुखणं द्यावं मात्र दाढदुखी देऊं नये.

तुला कल्पना नाहीं दादा, दाढ दुखायला लागली ती रात्र अगदी काळरात्रीसारखी वाटली मला ! या कुशीवरून त्या कुशीवर माशासारखी तळमळत होतें मी ! उभ्या रात्रीत पांच मिनिटंसुद्धां झोप आली नाहीं मला. उशींत डोकं खुपसून पाहिलं, दोन्ही हातांनी दाढ दाबून धरली, कितीतरी वेळ गुडघ्यांत मान घालून बसलें; पण कांही उपयोग नाहीं. अगदी रडकुंडीला आलें मी !

सकाळीं उठल्यावर सासूबाईंनी दाढेंत कापूर धरायला सांगितलं, कानांत तेल घातलं, पुष्कळ उपचार केले; पण कांही केल्या दाढ राहीना. मामंजी डॉक्टरांच्याकडे घेऊन गेले. दातांच्या डॉक्टरांच्या त्या दवाखान्याच्या पायऱ्या चढतांना माझी छाती अशी धडधडत होती म्हणतोस !

त्या खुर्चीवर बसतांना माझे पाय कसे लटलट कापूं लागले. तें खुर्चीजवळचं विचित्र यंत्र, तीं दिसणारीं चकचकीत हत्यारं, औषधांचा उग्र वास—माझ्या अंगावर कांटाच उभा राहिला.

दाढ किडली आहे नी पोखरून भरायला हवी असं डॉक्टरांनी सांगितलं. त्यांनी लावलेल्या औषधानं कालपासून जरा बरं आहे.

पण पोखरायची कल्पना मनांत आली की अंग कसं शहारतं बघ! काय होत असेल त्या वेळीं कुणास ठाऊक!

स्वारी परत आल्यावर दाढ भरून घ्यावी असं मनांत येतंय्! पण पुन्हा परवासारखी ठणकायला लागली तर काय करायचं बाई? मोठ्या पंचायतींत पडलें आहे मी! मामंजी नी सासूबाई भारी प्रेमळ आहेत. पण अशा वेळीं माणसाला जो धीर लागतो तो त्यांच्याकडून कसा रे मिळणार? बाकी काय पोरवड्याच आहे सारा घरांत! क्रिकेट खेळतांखेळतां दिनूभाऊजचिं बोट मागं एकदा दुखावलं होतं. ते मला म्हणतात, "वहिनी, माझ्या बोटा-पेक्षा कांही तुमची दाढ अधिक दुखायची नाही." त्यांना काय, बुडणाराचं दुःख काठावर उभं राहणाराला कधीच कळायचं नाही!

तेव्हा—तेव्हा तूंच दोन दिवसांकरितां इकडे येऊन जा की! तूं आलास म्हणजे मला तेवढाच धीर येईल.

घड्याळांत पांचच वाजले आहेत. पण दिवा लावल्याशिवाय लिहितां येणार नाही इतका काळोख झालाय्. आभाळ [illegible]कर अंधारलंय्, गारगार वारा सुटलाय्, नी धूळ तर अशी विलक्षण उडतेय् म्हणतोस! अवेळीं पडलेल्या या अंधाराचं फार भय वाटतं मला!

माझ्या मनाचं प्रतिबिंबच मला बाहेर दिसतंय्. पत्र मिळाल्याबरोबर निघशील ना ?

तुझी

**ताई**

**ता. क.**—खरंच ! कसल्याशा फुलझाडांवर तूं प्रयोग करीत होतास ना ? गतवर्षी याच दिवसांत मी तुझ्याकडे आलें होतें म्हणून सहज आठवण झाली. काय रे झालं त्या प्रयोगाचं ?

**ता. ता. क.**—नाहीतरी तूं भाऊबिजेला येणारच होतास. तो आताच ये म्हणजे झालं. अगदी वाट पाहातेंय् हं मी तुझी !

ता. क. च्या मागं खूप ता. ता. लावले नाही तर त्या बायका कसल्या असलीं टीका केल्याशिवाय राहणार नाहीस तूं ! तेव्हा इथंच थांबतें.

तुझी

**ताई**

* * *

बंगलोर

ता. ३१-८-३९

प्रिय ताई,

सप्रेम आशिर्वाद.

तुझं पत्र आलं त्या वेळीं मी फुलझाडांच्या त्या प्रयोगांतच गुंतलों होतों. हात मातीनं भरले होते म्हणून तुझ्या वहिनीलाच तुझं पत्र वाचायला सांगितलं.

पत्रांतला मजकूर ऐकतांऐकतां मला हंसूं येऊं लागलं. पण जातीला जात ओळखते म्हणतात तें कांही खोटं नाही. तुझी वहिनी सारा मजकूर

अगदी गंभीरपणानं वाचत होती. पत्र वाचून झाल्यावर मीं तिला म्हटलं, "अजून तूं उभी कशी?"

ती माझ्याकडे आश्चर्यानं पाहूं लागली.

मीं म्हटलं, "बन्संची दाद भरायचीय ना! जा, धावत जा, नी माझी ट्रंक भरायला लाग!"

तिनं मान झटकून माझा निषेध केला. तूंहि हें पत्र वाचून माझ्यावर डोळे वटारशील. पण अगदी लिहिल्याशिवाय रहावत नाही ताई!

तूं काय अजून कुक्कुबाळ आहेस होय! नवरा नाहीतर भाऊ समोर असल्याशिवाय दाद भरून घेण्याचा सुद्धा धीर होत नाही तुला! मग उद्या लढायची पाळी आली तर काय करशील तूं?

तूं आपल्या पत्रांत अंधारून आलेल्या आभाळाचं वर्णन केलं आहेस; लिहायला दिसत नाही इतका काळोख झालाय् म्हणून लिहिलं आहेस.

तुमचं बायकांचं जग म्हणजे खिडकींतून दिसणारं आभाळ हेंच खरं! पण कितीहि अंधारलं तरी असं काय भयाण दिसणार आहे तें? नुसती दाद भरून घ्यायची झाली तर तूं इतकी घाबरली आहेस याचं कारण दुसरं काय असणार? तुम्ही बायका नेहमी कल्पनेच्या जगांत वावरत असतां.

ताईसाहेब, आपणाला पत्ताहि नसेल! महायुध्दाच्या ढगांनी सारं जग अंधारून गेलं आहे. पुढं काय आहे हें कुणालाच दिसेनासं झालं आहे. लक्षावधि माणसांचे बळी घेणारी लढाई केव्हां सुरू होईल...

तूं मनांत म्हणशील, जेव्हातेव्हा या दादाचं असंच! आमटींत मीठ कमी पडलं तरी तेवढ्यावरून शरीराला कुठलींकुठलीं व्हिटामिन्स हवींत यावर सैपाक्याला व्याख्यान द्यायला हा कमी करायचा नाही. तेव्हा लढाईचं हें भविष्य इथंच संपवितों.

तुझी दाद भाऊबिजेपर्यंत थांबत असेल तर ठीकच आहे. आपण कांही तिकडे आधी यायला तयार नाही ! माझा प्रयोग कसा रंगांत आला आहे !

हो, फुलझाडांवरून बरी आठवण झाली. कांहीकांही फुलझाडं कुंड्यांत चांगली फुलतात; पण प्रयोगाकरितां बागेंतल्या मातींत लावलीं की तींच किती लवकर खुरटून जातात ! तुम्ही बायकासुद्धा अशाच !

हें वाचून तूं रागानं पत्राचे तुकडे तुकडे करायला लागशील ! तेव्हा अधिक लिहिण्यांत कांही अर्थ नाही.

तुझा

दादा

ता. क. शेवटीं थोडं ताक घ्यावं म्हणतात ना, म्हणूनं हें लिहिलं आहे.

विनायकराव परदेशीं गेले तेव्हा ते परत येईपर्यंत कांहीतरी सार्वजनिक कार्य कर म्हणून मी तुला सांगितलं होतं. खेडयापाडयांतल्या गोरगरीब बायकांना संततिनियमनाची माहिती देण्याचं काम शिकलेल्या बायकांनीच करायला हवं असंसुद्धां मी बोललों होतों. पण तुझ्या एकाहि पत्रांत त्याविषयीं चकार शब्द नाही ! फडके-खांडेकरांच्या कादंबऱ्या वाचण्यांतच सारा वेळ जात असेल तुझा ! नी आता काय! स्वारीच येणार ! —जर्मनीची नाहीं हं ! आमच्या ताईसाहेबांच्या पतिराजांची !

तुझा

दादा

* * *

बेळगांव

प्रिय दादा

ता. ३०-९-३९

सप्रेम न. वि. वि.

तूं आला नाहीस म्हणून रागावून मी तुला पत्र पाठविलं नाहीं असं

एकसारखं वहिनीपाशी घोकत असशील तूं! पण दादासाहेब, आपला तर्क सपशेल चुकलाय् हं!

तुझं पत्र यायच्या आधीच डॉक्टरांनी माझ्या दाढेवर हल्ला चढाविला होता! मला मुकाट्यानं त्यांच्या खुर्चीवर जाऊन बसावंच लागलं.

हें वाचून तुला मोठं नवल वाटेल, नाही?

तुला पत्र पाठविलं त्या दिवशीं रात्रीं दाढ पुन्हा अशी ठणकूं लागली, की मला रडतां भुई थोडी झाली. दुसरे दिवशीं सकाळी डॉक्टरांना दाखवायला गेलें. मामंजींचा उपास असल्यामुळं दिनूभावोजी बरोबर आले होते. डॉक्टर हसत म्हणाले, "पोखरलेली दाढ औषधानं कशी थांबेल? त्याला स्टफिंगच करायला हवं! चला, आताच सुरवात करूं या! दोन तीन सिटिंगजमध्यें काम आटपेल!"

मी एकटी असतें तर कांहीतरी सबब सांगून पळ काढला असता! पण दिनूभावोजी माझ्याकडे पाहून गालांतल्या गालांत हसताहेत हें जेव्हां मी पाहिलं, तेव्हां त्यांच्या थट्टेपेक्षां यंत्राजवळची खुर्चीच बरी वाटली मला.

मोठ्या धिटाईनं मी खुर्चीवर जाऊन बसलें खरी; पण तोंडावरला विजेच्या दिव्याचा प्रकाश, अवघडून मागं टेकलेली मान, जबडा अधिक उघडून धरल्यामुळं त्याला पडलेला ताण...

डॉक्टरांनी तें गिर्रमिट सुरू केलं तेव्हा तर मी डोळेच मिटून घेतले. माझे पाय लटलट कापत होते. हाताचे तळवे घामानं ओलेचिंब झाले होते. छाती धडधडत होती.

माणसाला कल्पनाशक्ति नसती तर किती बरं झालं असतं! मी जेव्हा त्या खुर्चीवरून उठलें तेव्हा हाच विचार माझ्या मनांत आला. दाढ पोखरण्याचा केवढा बाऊ करून ठेवला होता माझ्या मनानं! छेः, दोरीचा साप मानून मनुष्य उगीचच भीत असतो!

उद्यापरवा डॉक्टर माझी दाढ भरतील! पण एक काळजी मागं पडली तोंच दुसरी सुरू झाली.

लढाई सुरू झाली!

तिकडे युरोपांत काय हलकल्लोळ झाला असेल तो कुणाला ठाऊक! पण इथं व्यापाऱ्यांनीच गिऱ्हाइकांबरोबर लढाई सुरू केली आहे. साखर, रॉकेल, कागद, औषधं—भरमसाट किंमती वाढविल्या आहेत साऱ्यांनीं! जणू कांही युद्धानंतरची लूट आधीच करून घेताहेत!

या महागाईची गोष्ट सोडून दे. पण तिकडची आठवण झाली नाहीं अशी एक घटका जात नाही बघ!

नुकतीच ती अँथनिया बोट बुडविली बघ. एरवी मी रोजच्या वर्तमानपत्रांना हातसुद्धा लावीत नाही. पण ही बोट बुडाल्याची बातमी मी पुनःपुन्हा प्रत्येक वर्तमानपत्रात वाचली नी डोळ्यांपुढं काय भयंकर चित्र उभं राहिलं म्हणतोस. त्या बोटींतून जीं माणसं वांचाविलीं त्यांत एक बाई होती. पण मुलाकरिता तिनं समुद्रांत उडी टाकली नी बिचारीं दोघंहि बुडून गेलीं.

तें आठवून एकसारखं मनांत येतं— स्वारी सुरक्षित परत येईल ना? मागच्या पत्रानंतर त्यांच्याकडून कांहीच कळलं नाही. मामंजी म्हणतात, विनायकाचे ग्रह चांगले आहेत. काळजी करण्याचं कांही कारण नाही.

माझा नाही यावर विश्वास बसत. या अँथनिया बोटीवरल्या साऱ्याच माणसांचे ग्रह काय वाईट होते?

सासूबाई मंगळवार करायला सांगताहेत. एकीकडून त्यांचं ऐकावंसं वाटतं, दुसरीकडून मैत्रिणी थट्टा करतील ही भीति वाटते.

स्वारी परदेशी कशाला गेली असं झालंय् मला. त्यांच्या पूर्वीच्या शिक्षणावर चार पैसे कमी मिळाले असते तरी आम्ही जन्मभर सुखानं राहिलों असतों. पण आता—

नाहीनाही त्या कल्पना मनांत येतात. मन कसं गोंधळून जातं. आपल्या आयुष्याला कांही अर्थ नाही असं वाटूं लागतं.

दादा, कायरे करूं मी !

तुझी दुर्दैवी,

ताई

*　　　*　　　*

बंगलोर

ता. १५-९-३९

प्रिय ताई,

सप्रेम आशीर्वाद.

तुझं पत्र पोंचलं. वेडे पोरी, जगणं म्हणजे कल्पनेत रमणं नव्हे. अनुभव घेणं म्हणजे जगणं. तुझ्या दादेवरनं तरी तुला हे कळायला हवं होतं !

तुला विनायकरावांविषयीं काळजी वाटणं स्वाभाविक आहे. पण त्या काळजीचं स्वरूप किती बालिश आहे ! तुझ्या पत्रावरून तूं कॉलेजांत दोनतीन वर्षं काढलीं आहेस हें खरंसुद्धा वाटणार नाही कुणाला !

लढाईमुळं युरोपांतल्या देशांत काय हाहाःकार उडाला असेल याची तुला कल्पना आहे का ? कालच कुठंसं एक चित्र आलं आहे. त्यांत एक सैनिक लढाईवर जातांना आपल्या चार वर्षांच्या मुलाचं चुंबन घेत आहे. मोठं हृदयस्पर्शी दृश्य आहे तें ! पण त्या चित्रांतल्या सैनिकाच्या डोळ्यात मुलाविषयीचं प्रेम तेवढं आहे. एकसुद्धा अश्रुबिंदु नाही.

ताई, या सैनिकांनी काय युद्ध व्हावं म्हणून देवापाशी प्रार्थना केली होती ? तुझ्याइतक्याच निरपराधी अशा लक्षावधि स्त्रियांचे पति आज मृत्युमुखांत जाऊन उभे राहिले आहेत. त्यांचं दुःख—

ही व्याख्यानाची लहर इथंच थांबवितो.

माझ्या फुलझाडांवरल्या प्रयोगांत एक गोष्ट अगदी निश्चित झाली आहे. बागेतल्या फुलझाडांत रानवेलींची जीवनशक्ती असत नाही !

ताई, तूं आयुष्य ही एक बाग मानीत आहेस. ती बाग नाही, तें अरण्य आहे.

कुठल्या तरी कामांत तूं आपलं मन गुंतवून घेतलं असतंस म्हणजे विनायकरावांच्या आठवणीनं तुला होणारं दुःख निश्चित कमी झालं असतं !

ताई, जगांत प्रत्येकाच्या आयुष्याला अर्थ आहे. पण बहुतेक माणसं आपल्या आयुष्यावर नाखूष असतात ! याचं कारण सांगूं का तुला ? आयुष्याच्या ग्रंथांतून त्यांना हवा तो अर्थ निघत नाही !

तुझा,

**दादा**

*　　　*　　　*

मुंबई

ता. २४-९-३९

प्रिय दादा,

सप्रेम नमस्कार.

तुम्हां शास्त्रीय विषय शिकविणाऱ्या लोकांना काळीजबिळीज कांही नसतंच का रे ? फुलझाडं असोत नाहीतर माणसांचीं मनं असोत, त्यांची चिरफाड करण्यांतच तुम्हांला आनंद वाटतो.

परवा कुठल्याशा महाराजांची बोट पकडल्याची बातमी पसरली होती. त्या बोटीवर आणखी खूप हिंदी माणसं होतीं असेंहि लोक म्हणूं लागले. ती बातमी ऐकून आमच्या घरांत साऱ्यांच्या तोंडचं पाणी पळालं. मी तर दिनूभावोजींना घेऊन तडक मुंबईला आलें. तिथल्यापेक्षा इथं कुठलीहि बातमी चटूकन कळते. इथं आल्यावर ती बोटीची बातमी अजिबात खोटी होती असं कळलं. माझा जीव कसा भांड्यांत पडला!

पण मुंबईत राह्यलाहि माझं मन येत नाही. इथं रात्रींच्या अंधुक दिव्यांपासून सिनेमाच्या रोडावलेल्या शेवटच्या शोपर्यंतच्या साऱ्या गोष्टी माणसाला लढाईचीच आठवण करून देतात.

त्यांचं पत्र येऊन महिना झाला. कुठं असतील ते?

दादा, कांहीकांही सुचत नाही मला. उद्या संध्याकाळच्या मेलनं तुझ्याकडं येतें. स्टेशनवर ये हं.

तुझी,

**ताई.**

**ता. क.** बायका म्हणजे कुंडींतलीं फुलझाडं हें तुझं म्हणणंच शेवटीं खरं ठरतंय्! कुंड्यांतून बाहेर काढल्या की त्या लगेच सुकतात!

* * *

बेळगांव,

२६·९·३९.

प्रिय दादा,

सप्रेम नमस्कार.

काल स्टेशनावर साऱ्या गाडींत तूं मला शोधलं असशील.

तूं सेकंड क्लासच्या डब्यापाशीं आलास तेव्हा त्याच्यांतून एक उंच, पिंगट डोळ्यांची नी हसऱ्या चेहऱ्याची मुलगी खाली उतरली ना?

ही मुलगी जर मला गाडींत भेटली नसती तर मी थेट तुझ्याकडे आलें असतें नी स्टेशनवर तूं दिसतांच तुझ्या गळ्यांत गळा घालून रडलें असतें.

पण—कल्याण मागं पडल्यावर तिनं आपणहून माझी ओळख करून घेतली. लढाई सुरू झाल्यामुळं मी फार काळजींत आहे असं ऐकतांच ती हसूं लागली.

प्रथम तिच्या हसण्याचा राग आला! पण नंतर तिनी सर्व हकीकत जेव्हां ऐकली...

ती मुलगी ज्यू आहे. तिचे प्रेम एका जर्मन कलावंतावर बसलं. त्यांचं लग्न जर्मनींत होणं शक्यच नव्हतं! म्हणून त्यांनी काय युक्ति काढली आहे का ठाऊक? तिचा प्रियकर हिंदुस्थानांत आला. ही इंग्लंडमधे गेली. इथं त्याचा धंदा चांगला चालायला लागल्यावर हिनं इकडे यायचं नी मागं लग्न करायचं असं त्या दोघांचं ठरलं होतं.

त्याच्या पत्राप्रमाणं ती निघाली नी मुंबईला येऊन पोंचली. पण आता तो आहे तुरुंगांत! त्याचं पत्र गेल्यावर लढाई सुरू झाली नी साऱ्या जर्मन लोकांना पकडण्यांत आलं. हिचा प्रियकरहि त्यांत सापडला.

मुंबईलाच तिला हें कळलं, पण ती डगमगली नाही. बंगलोरला तो अटकेंत आहे तिथं जाऊन तुरुंगांतच त्याच्याशीं लग्न करायचं ठरविलं आहे तिनं!

एखाद्या कादंबरीसारखं वाटतं नाही हें?

पुणं सुटल्यावर तिचा डोळा लागला. पण कांही केल्या मला झोप येईना. माझ्या डोळ्यांपुढं दोन चित्रं नाचूं लागलीं. एक ती मुलगी नी दुसरी मी!

माझ्यापेक्षा एखाद्या वर्षानं लहानच असेल ती! पण तिचा धीर, तिचं धाडस, संकटांवर मात करण्याची तिची ईर्ष्या—तिच्या पासंगालासुद्धा लागणार नाही मी या गुणांत! माझ्यासारखी हिंदु स्त्री पाहुणे घरीं आले तर चार चांगले पदार्थ करील आणि रात्र पडल्यावर नवरा घरीं आला नाही तर काळजी करीत बसेल. पण तिला माहेरीं जायलासुद्धा सोबत लागेल; मग तुरुंगांतल्या मनुष्याशीं लग्न लावण्याची गोष्ट दूरच राहिली! आपलं मनुष्य तुरुंगांत गेलं, की ती मुळूमुळू रडत बसेल! असं कां बरं व्हावं?

आगगाडीच्या चाकांबरोबर माझं मन एकसारखं खडखडाट करीत फिरत होतं.

एक गोष्ट मला स्पष्ट कळून चुकली. माहेर, सासर, शाळा, कॉलेज—या साऱ्या आम्हां बायकांच्या कुंड्या आहेत अजून. मग रानवेलीसारखं दूरदूर मुळं पसरण्याचं सामर्थ्य आमच्या अंगांत कुठून यावं?

बेळगांव जवळ आलं तेव्हा मीं खिडकींतून बाहेर पाहिलं आभाळ अंधारलं होतं.

मीं मनांत त्या अंधाराचं स्वागत केलं.

आभाळ अंधारल्याशिवाय कधी पाऊस पडेल का?

विनायकराव परत येईपर्यंत आमच्या शेतीच्या खेड्यांत जाऊन साक्षरतेचं काम करायचं ठरविलं आहे मीं.

खेड्यांत आणखीहि एक फायदा आहे! कुंडींतलीं फुलझाडं तिथं फारशीं दिसायचीं नाहीत! जिकडे पहावे तिकडे रानवेलीच दिसतील नाही!

तुझी,

ताई.

१

## एक झाड

वृक्षावरल्या फुलांचा सुगंध दशदिशांत दरवळूं लागला.

मार्गानें जाणारा प्रत्येक प्रवासी त्या सुवासाने मुग्ध होऊन क्षणभर थांबल्यावाचून पुढें जातच नसे.

वृक्षावर पिकूं लागलेल्या फळांच्या वासानें मोहून जाऊन विविध रंगाचीं पांखरें किलबिल करीत त्याच्याभोंवती नाचूं लागलीं.

फळांफुलांना स्वर्ग दोन बोटें उरला.

प्रत्येक दिवशीं सकाळीं माळी त्या झाडांच्या मुळांना पाणी घाली.

एकदां फुलें त्या माळ्याला म्हणालीं 'माळीदादा, अगदीं वेडा आहेस तूं! तिथं खालीं मातींत पाणी कशाला ओततोस? झारीनं आमच्याबर तुषार उडीव. म्हणजे ते मोत्यांप्रमाणें चमकत राहतील!'

फळांनींही तोच हट्ट धरला. त्यांना वाटलें—वेड्यावांकड्या, रंगरूप नसलेल्या, आणि अष्टौप्रहर मातींत लोळणाऱ्या मुळांना काय म्हणून अभिषेक करायचा?

माळ्यानें आपल्या पाण्यानें फुलें आणि फळें शिंपायला सुरवात केली.

पाणी मिळत असूनही फुलें कोमेजलीं, फळें सुकूं लागलीं.

शेवटीं तीं माळ्याला विनवून म्हणालीं, 'माळीदादा, मातींतल्या या मुळांनाच आधीं पाणी घाला! तीं जगलीं तरच आम्हीं जगूं!''

# १०

## तिचे अश्रू!—

"या जगांत प्रत्येकाला जगण्याचा अधिकार आहे." श्रोत्यांतून टाळ्यांचा कडकडाट झाला. प्रो. कात्रे यांनी स्मित [illegible] टाळ्यांचा स्वीकार केला.

तरलेचें लक्ष प्रोफेसरांच्याकडे गेलें. ते आपल्याकडे पाहात आहेत असा तिला भास झाला.

लगेच स्वतःची चूक तिच्या लक्षांत आली. तिला वाटलें, आपल्या जवळच प्रो. कात्र्यांची पत्नी कुठेतरी बसली असावी तिच्याकडे ते पाहात असतील!

या अज्ञात पत्नीचा तिला हेवा वाटला. तिच्या मनात आले प्रोफेसर साहेबांनी बायकांच्या बाजूला पाहिलें तें आपल्या पत्नीशीं नेत्रपल्लवी

याकरितांच असावें ! खरेंच, अशा डोळ्यादेखल्यांच्या संभाषणात केवढा आनंद आहे ! नवरा एखाद्या शूर पुरुषाप्रमाणें व्यासपीठावर उभा आहे, त्याच्या प्रत्येक वाक्याला श्रोत्यांतून टाळ्या मिळत आहेत आणि हा त्याचा गौरव पत्नीला पाहायला मिळत आहे !

प्रोफेसर पुढे बोलूं लागले –

"या अनाथ बालकाश्रमांतल्या मुलांमुलींतूनहि राष्ट्राचा उद्धार करणारी एखादी थोर विभूति निर्माण होईल. नाही कुणी म्हणावें ? नीति-अनीतीच्या कल्पनांना कवटाळून या कलिकांचा चोळामोळा करणें यापेक्षां जगांत दुसरें मोठें पाप नाही."

पत्र्यांवर ताडताड गारांचा पाऊस पडावा तसा टाळ्यांचा कडकडाट झाला.

श्रोत्यांच्या टाळ्या थांबल्या तरी तरलेचे हात कौतुकाने आपलें काम करीतच होते. प्रोफेसरांचें तें वाक्य तिच्या कानांत अजून घुमत होतें— "नीति--अनीतीच्या कल्पनांना कवटाळून या कलिकांचा चोळामोळा करणें..."

तिच्या मनांत आलें, उभ्या जन्मांत असें एक वाक्यसुद्धां आपल्या तोंडांतून कधी बाहेर पडलें नाही ! आणि असलें वाक्य एखाद्या वेळीं आपल्याला सुचलें तरी शेकडो माणसांच्यासमोर तें बोलण्याचा धीर आपल्याला होईल का ?

नको ग बाई ! इतक्या माणसांसमोर जाऊन नुसतें उभें राहायचें म्हटलें तरी आपले पाय लटलट कांपूं लागतील. मग तोंडांतून शब्द बाहेर काढणें लांबच राहिलें !

ती विलक्षण आदराने प्रोफेसरांच्याकडे पाहूं लागली. तिला वाटलें, नदीला मोठा पूर आला असावा, तांबड्यालाल पाण्याच्या लाटांवर लाटा

उसळत असाव्यात, तें पाणी पाहून काठावर उभ्या राहिलेल्या माणसाचे डोळे फिरून जात असावेत आणि अशा महापुरांतून एखादा मनुष्य लीलेने आपलें डोकें वर काढून पोहत असावा—अगदी तस्सें आपल्यासमोरचें दृश्य आहे !

पावसाची मुसळधार सर यावी तसें कात्र्यांचें वक्तृत्व सुरू झालें होतें—"नीति ? माणुसकीपेक्षां नीति कांही निराळी नाही ! आपल्या समाजाचें मंदिर या जुन्या नीतीच्या कल्पनांनी पोखरून गेलें आहे. तें जमीनदोस्त करून त्या ठिकाणीं आता नवा बंगला बांधला पाहिजे. आपल्या समाजवृक्षाला कीड लागली आहे. हा वृक्ष तोडून टाकून त्या ठिकाणीं नवा वृक्ष लावला पाहिजे. आपल्या समाजपुस्तकाची पहिली आवृत्ति फार जुनाट झाली आहे. पण अजून बाजारांत या आवृत्तीचीं कसरीनें खाल्लेली पुस्तकेंच विकली जात आहेत. तीं पुस्तकें रद्द करून आपणांला नवीन सुधारून वाढविलेली आवृत्ति काढली पाहिजे ! समाजांतल्या नीतिनियमांचा टाइप वापरून वापरून फार झिजला आहे. आता हा टाईप वितळवून टाकून आपल्याला नवा टाइप निर्माण केला पाहिजे."

प्रोफेसर बोलत होते, तरला डोलत होती, नी लोक टाळ्या वाजवीत होते.

तरला कौतुकाने मनांत म्हणत होती—"यांना इतकें हें सुचतें तरी कसें ? अशा बुध्दिवान मनुष्याची ओळख होणें हेंसुद्धां केवढें भाग्य आहे !"

अनाथ बालकाश्रमांतल्या मुलांना लोकांनी सहानुभूतीने वागवावें म्हणून प्रो. कात्रे जीव तोडून बोलत होते. जुन्या विचारांच्या तटबंदीवर त्यांनी आज आपल्या वक्तृत्वाच्या सर्व तोफा डागल्या होत्या.

त्यांच्या प्रत्येक वाक्याबरोबर तरलेच्या मनाला विलक्षण आनंद होत होता. प्रोफेसर सर्व समाजापुढे अनाथ बालकांचीच नव्हे, तर आपलीहि वकिली करीत आहेत असा तिला भास होत होता.

लवकरच कान्यांच्या भाषणापेक्षाहि आपल्या आयुष्यांतल्या जुन्या आठवणींत ती अधीक रंगून गेली.

सुंदर रूपामुळें ती खेडयांतल्या श्रीमंत स्थळी पडली होती. पण दैवाला तें सहन झालें नाही. लग्नानंतर लवकरच ती विधवा झाली.

सख्ख्या सासूखेरीज तिला जवळचें असें कुणीच नव्हतें. नात्या-गोत्याचीं खूप माणसें खेड्यांतल्या त्या भल्या मोठ्या घरांत तिच्या-भोवती गर्दी करून असत. पण त्या गर्दीत तिला गुदमरल्यासारखें होई. सकाळपासून संध्याकाळपर्यंत तिला इकडची काडी तिकडे करावी लागत नसे. असें असूनहि तिच्या मनाला कधी क्षणाचाहि स्वस्थपणा लाभला नाही.

सकाळीं गोठ्यांत गडी गायीचें दूध काढू लागला की ती सहज तिथे जाई. दूध काढायच्या आधी वासरू गायीकडे जाण्यासाठी विलक्षण धडपड करी आणि लुचण्याकरितां सोडल्यावर आईला ढुशा मारी. हें पाहून तरलेचें मन बेचैन होई. तिला वाटे—आपल्याकडे दुडुदुडु धावत येणारें एखादें बाळ असतें तर—दूध पिण्याकरितां लहान मूल जेव्हा आईच्या पदराआड आपलें डोकें लपवितें तेव्हा तिला किती विलक्षण आनंद होत असेल! खिन्न मनाने धार पुरी व्हायच्या आधीच ती गोठ्यांतून निघून जाई.

देवळाच्या पलीकडेच तिचा उसाचा मळा असे. ऊस खूप उंच झाला की तिला त्या मळयांतून फिरण्याची मोठी गंमत वाटे. एकदा ती अशीच फिरत असतांना पलीकडे ऊस सळसळला. ती भीतीनें एका बाजूला लपून राहिली.

शंकर गडयाची बायको धावत येत होती. तिच्या अंगावरल्या लुगडयाच्या चिंध्या झाल्या होत्या. पण तिच्या मुद्रेवर आनंद नुसता ओसंडून वाहत होता.

शंकर तिच्या मागोमागच धावत आला. त्याने हांहां म्हणता तिला पकडलें आणि—

तें दृश्य तरलेने अगदी अतृप्त दृष्टीने पाहिलें.

त्या दिवशी रात्री कांहीहि होत नसतांना तिला घटकाभर सुद्धां स्वस्थ झोप आली नाही. अंगाला कुसरडा लागल्यावर कितीहि चोळलें तरी त्यांची कुसें नाहींशीं होत नाहींत. आपल्या मनालाहि तसेंच कांहीतरी झालें आहे असें तिला त्या रात्री वाटलें.

शंकर गडयाची बायको नी गायीचें वासरू राहूनराहून तिच्या डोळ्यां-पुढें उभी राहूं लागलीं. तिचें मन म्हणत होतें, जें सुख पशूंना मिळतें, जें सुख दरिद्री माणसांना मिळतें, तें मला कां मिळूं नये ?

दररोज रात्री आपल्या खोलीतल्या खिडकीतून आकाशाकडे पहात ती उभी राही. पण स्वतःला पडलेला हा प्रश्न तिला कधीच सुटला नाही.

एखाद्या रात्री ती आपली उशी अश्रूंनी चिंब भिजवून टाकी. पण त्या अश्रूंनी तिच्या हृदयातली आग विझली नाही.

पुनर्विवाह !

खेडगावांतल्या मुलीच्या दृष्टीने केवढें मोठें दिव्य होतें तें ! वडील, सासू, नातेवाईक, सारीं म्हणत, "एक कुंकू सोडलं तर तरलेला काय कमी आहे !"

त्यांच्या तोंडावर उत्तर देण्याचा धीर तिला कधीच झाला नव्हता !

पण त्याची पाठ फिरली, म्हणजे ती स्वतःशी म्हणे—"या माणसांना कांही मन आहे का ?"

सासू मरण पावतांच तरलेने शहरात जाउन राहायचें ठरविलें.

शहरांत नुकताच अनाथबालकाश्रम स्थापन झाला होता. श्रीमंत तरलेकडे आश्रमाचे चालक गेले.

अनाथ मुलें !

तिने हौसेने आश्रमाला चांगली देणगी दिली.

स्वप्नांतून जागें व्हावें त्याप्रमाणे सावध होऊन तरलेने समोर पाहिले.

आश्रमाचे चालक प्रो. कात्र्यांचे आभार मानीत होते—"कात्रे हे आमच्या शहराचे भूषण आहेत! पुण्या-मुंबईच्या जोडीला आपलें शहर यावें यासाठी ते रक्ताचें पाणी करीत आहेत. समाजाच्या रागालोभाला न भितां माणुसकी हाच खरा धर्म आहे असें प्रतिपादन करणारे त्यांच्यासारखे थोर वक्ते विरळाच सापडतील" इत्यादि इत्यादि.

तरलेला वाटलें, प्रोफेसर कात्रे ही एक मोठी विभूति आहे. माणसांची पूजा करण्याची पद्धत असती तर आपण—

चालक प्रोफेसरांच्या गळ्यांत हार घालीत होते तें पाहून तिला वाटलें, हा हार घालण्याची संधि आपल्याला मिळाली असती तर...!

लगेच तिच्या मनांत आलें—छः! तें पाहून त्यांच्या बायकोला काय वाटलें असतें ?

चहाच्या वेळीं प्रोफेसरांच्या पत्नीचा व आपला परिचय होईल अशी तिची कल्पना होती.

आश्रमाच्या चालकानी तिची प्रोफेसरसाहेबाशीं ओळख करून दिली. त्यांच्याजवळ बसलेली तरुणी त्यांची पत्नी असेल अशा समजुतीने तरलेने तिला नमस्कार केला.

अर्धवट कात्र्यांकडे व अर्धवट त्या तरुणीकडे पाहात तरलेने विचारलें, "मुलं आणलीं नाहीत वाटतं?"

त्या तरुणीने हसत विचारलें, "कुणाची मुलं! मी यांची मैत्रीण आहे! बायको नव्हे!"

कात्रे एवढ्या मोठ्याने हसले, की उभ्या जन्मांत त्यांनी असला विनोद ऐकला नसावा!

तरला मनांत लाजून गेली. पण गप्प बसणें अगदीच गैर दिसलें असतें म्हणून ती कात्र्यांना म्हणाली, "आपल्या पत्नी कां आल्या नाहीत?"

"नेहमी आजारी असते ती!"

तरलेला फार वाईट वाटलें. मोठ्या माणसांना नेहमीं दुःखी ठेवण्यांतच देवाला आनंद होत असावा असें कांहीतरी तिच्या मनांत आलें. ती प्रोफेसरांना म्हणाली, "केव्हांतरी सवडीनं माझ्याकडे चहाला याल का?"

"अवश्य!"

'अवश्य' हा शद्ब उच्चारतांना प्रोफेसरांनी तरलेकडे पाहून जें स्मित केलें तें घरीं गेल्यावर तिला एकसारखें आठवत होतें. मात्र प्रोफेसर आपला शद्ब लवकर खरा करून दाखवतील अशी तिला मुळींच कल्पना नव्हती.

त्यामुळे रात्रीं दहा वाजता दरवाजावरली घंटा वाजली तेव्हां इतक्या अवेळीं आपल्याकडे कोण आलें असावें याविषयी तिला आश्चर्य वाटलें. प्रोफेसरसाहेबाची स्वारी पाहाताच हें आश्चर्य द्विगुणित झालें.

प्रोफेसर मोठ्या मधुर वाणीने म्हणाले,

"माझ्या येण्यानं आपली झोपमोड तर झाली नाही ना ?"

'छेः! मी काही लवकर झोपत नाही!'

"कां? अपुऱ्या झोपेनं स्त्रीचं सौंदर्य नाश पावतं हें ठाऊक नाही वाटतं तुम्हाला ?" हसतहसत कात्र्यांनी विचारलें.

काय बोलायचें तें तरलेला सुचेना.

एक शंका मात्र राहूनराहून तिच्या मनांत येत होती—आपली पत्नी आजारी आहे असें संध्याकाळीं प्रोफेसरांनीं सांगितलें होतें. मग अशा वेळीं त्यांनी घरीं असायला नको का? तिने हळूच विचारलें, "आपल्या पत्नीची प्रकृति कशी आहे?"

"ती अगदी शतायुषी होणार आहे!" सिगारेटच्या धुराच्या वल्यांकडे पाहात शांतपणाने प्रोफेसर उद्गारले.

तरला कोड्यांत पडली. नवराबायकोचें कांहीतरी बिनसलें असावें हें उघड होतें. पण आजच संध्याकाळीं आपली व कात्र्यांची ओळख झालेली. मनुष्य स्वभावाने कितीहि मोकळा झाला तरी पांच तासांच्या परिचयांत आपलें मन दुसऱ्यापाशीं उघडें करण्याचा धीर त्याला कसा होईल?

ती स्तब्ध राहिली. प्रोफेसर बोलूं लागले, "तरलाबाई, हृदयाच्या जखमा मोठ्या वाईट असतात. त्या बांधून ठेवण्यापेक्षा उघड्या केल्या तर

माणसाला बरं वाटतं ! पण वाटेल तिथं त्या उघड्या करून चालत नाहीत ! कुठली जखम केव्हां सेप्टिक होईल याचा नेम नसतो !"

तरला सहानुभूतीने त्यांच्याकडे पाहूं लागली. प्रोफेसर म्हणाले, "तरलाबाई, माझ्याइतका दुर्दैवी मनुष्य उभ्या जगांत नसेल ! सकाळपासून संध्याकाळपर्यंत अगदी घाण्याला जुंपल्यासारखी माझी स्थिति असते. सकाळी साऱ्या संस्थाच्या भानगडी, दुपारी कॉलेज, संध्याकाळी कुठं ना कुठं व्याख्यान–घटकेची विश्रांति मिळत नाही मला. सारी कामं संपवून घरी जावं तर तिथं बायको आपली कपाळाला आठ्या घालून तयार आहे. तुम्हीच सांगा आता. प्रेमाच्या साध्या स्पर्शानं माणसाचा सारा शीण नाहीसा होतो ! पण तो स्पर्शच आमच्या कपाळी नाही. घरी जावं तो आपल्या हिच्या तक्रारी आहेतच–मीना ओकली नी दीनाला परसाकडे झालं नाही, गड्यानं कोळसे आणले ते वाईट निघाले नी वाण्यानं साखरेत फसविलं."

प्रोफेसरांचें सांत्वन कसे करायचे तें तरलेला कळेना ? कांहीच सुचेना तेव्हां ती त्यांच्याजवळ येऊन उभी राहिली.

तिच्याकडे पाहात प्रोफेसर उद्गारले, "या कर्मकटकटींनी कपाळ कसं तापून जात पाहा !"

तरलेचा हात घेऊन तो त्यांनी आपल्या कपाळावर ठेवला. त्यांनी हात हातात घेतला तेव्हां तो मागे घेण्याची तरलेने क्षणभर चुळबुळ केली. पण काऱ्यांच्या कपाळाचा चटका बसतांच तिने करुणेने आपला हात त्यांच्या कपाळावर राहूं दिला.

काऱ्यांची तरलेच्या घरी रात्री दहा वाजतां नियमित फेरी होऊं लागली.

एखादे दिवशीं ते तिला घेऊन हवा खायेला जात; एखाद्या दिवशीं सिनेमाला जात.

गडीमाणसांच्या हातावर मोकळ्या मुठीने पैसे ठेवण्याचा त्यांचा प्रघात होता; त्यामुळे तरलेच्या घरांतले एक मांजर सोडून बाकी सर्वांना प्रोफेसरसाहेब आवडूं लागले.

त्यांचे कुठलेंहि व्याख्यान तरला चुकवीत नसे.

कात्र्यांचे वक्तृत्व ऐकतांना ती देहभान विसरत असे. किती निर्भीड-पणाने ते बोलत—

"प्रत्येक तरुणाला नी तरुणीला प्रेम करण्याचा अधिकार आहे !"

"तरुणांनों, गुलाम होऊं नका. तरुणींनो, गुलामगिरीत खितपत पडूं नका."

"प्रीति हे नीतीचें जगांतलें सर्वश्रेष्ठ स्वरूप आहे."

प्रोफेसरांची अशा प्रकारचीं वाक्यें ऐकून तरलेला गुदगुल्या होत.

कुढत, रडत, निष्प्रेम आयुष्य घालविण्यापेक्षा आयुष्याच्या मार्गावर मिळणाऱ्या प्रीतीचा धैर्यानें स्वीकार करण्यांत जीवनाचें सार्थक आहे असें तिला वाटूं लागलें.

तिला कात्र्यांच्या बुद्धीविषयी आदर वाटत होता. आपल्या निष्प्रेम आयुष्याचें ते जें चित्र रेखाटीत त्याची तिला करुणा येत होती. आपण एकटें राहाणें म्हणजे कुजून मरणें ही कल्पना तिच्या मनांत अगदी दृढमूल झाली होती !

या जगांत आपण आणि प्रोफेसर यांच्याशिवाय कुणीहि नाही असें एका क्षणीं तिला वाटलें.

तो क्षण आपल्या आयुष्यांत आला नसता तर बरें झालें असतें असेंहि मागाहून तिला वाटलें पण लगेच तिच्या मनांत आलें— त्या एका क्षणांत तरलेचा पुनर्जन्म झाला. ती पूर्वीची भित्री तरला कुठल्या कुठे नाहींशी झाली.

एखाद्या लहान मुलाला अगदी अनपेक्षित असे खेळणें खेळायला मिळालें म्हणजे त्याला जसा साऱ्या जगाचा विसर पडतो तशी तरलेची स्थिति झाली.

प्रोफेसर कात्र्यांसारखा मोठा मनुष्य आपला झाला आहे या आनंदांत ती दंग होती. लोक आपल्याविषयी कांही वाईट बोलत असतील अस्वस्थ होण्याइतकी सुद्धा ती विचार करीत नसे. आणि गोष्टीची जाणीव तिला करून दिली असती तर तिने हसतहसत असतें, " मला लोकांशीं काय करायचंय् ? मला हवं होतं तें मि

अनाथ बालकाश्रमाच्या पुढच्या समारंभाला कात्र्यांचें झालें तें तिला गतवर्षीहूनहि अधिक चांगलें वाटलें. कात्र्यांन विचारलें, " कर्ण हा कुंतीला लग्नापूर्वी झालेला मुलगा होता. सत्यवतीला लग्नापूर्वी झालेला मुलगा होता. पण कर्णासारखा महाभारतांत दुसरा कोण आहे ! आणि महाभारत लिहिणाऱ्य एकातरी कुलीन कवीची तुलना करतां येईल कां ?

प्रोफेसरांच्या या प्रश्नांचें तरलेला केवढें कौतुक वाटलें !

या प्रश्नानंतर त्यांनी लग्नसंस्थेवर जो हल्ला चढविला होता तो सुध्दां किती विलक्षण होता !

कात्रे म्हणत होते, " लग्नं भटाभिक्षुकांनी टाकलेल्या अक्षतांनी होत नाहीत ! दोन माणसांच्या डोळ्यांत नाचणाऱ्या प्रीतीच्या तुषारांनी होतात. लग्नाचा खरा शिक्का-मोर्तब म्हणजे रजिस्ट्रारच्या कचेरीचा शिक्का नव्हे. एका

व्यक्तीने दुसऱ्या व्यक्तीपुढे केलेला लाजरा कपोल आणि दुसऱ्या व्यक्तीने त्यावर उठवलेली आरक्तमधूर मुद्रा ! बाहुल्यांचीं लग्नें पृथ्वीवर होतात; माणसांचीं लग्नें स्वर्गांत होत असतात."

काऱ्यांचें हें वक्तृत्व ऐकतांना तरलेला वाटलें, आपणां दोघांमधल्या प्रेमाचें किती सुंदर मंडन करताहेत हे ! लोक आपल्या प्रेमाला खुशाल पाप म्हणोत ! म्हणेनात ! आपल्याला लोकांशीं काय करायचंय् ? आपल्याला हवें ते आपल्याला मिळालें आहे.

पण जसजसे दिवस जाऊं लागले तसतसें तरलेला कांहीतरी चुकल्या-चुकल्यासारखे वाटूं लागलें. प्रोफेसरांचीं सारी व्याख्यानें तिला आता तोंड-ऽ झालीं होती. पहिल्यापहिल्यांदा तीं ऐकतांना तिला जो विलक्षण र होत असे तो आता हळूहळू ओसरूं लागला. एक बुध्दिवान मोठा थ्य आपण अंकित केला आहे एवढयावरच तिचें आता समाधान होईना.

ज्यांना मोठमोठीं कामें करायचीं आहेत त्यांनी आपल्या घरांत मुलांची लुडबूड असूं देऊं नये हें काऱ्यांचें म्हणणें तिला पहिल्यापहिल्यांदा खरें वाटलें होतें. आता मात्र तिच्या मनांत येऊं लागलें—पुरुष जन्मभर कुठल्या ना कुठल्या धुंदीवर जगूं शकतात. पण बायकांना या धुंदीपलीकडचे कांहीतरी हवें असतें. सभेंतल्या टाळ्या, गळ्यांत पडणारे हार, रस्त्याने जातांना आपल्याकडे कौतुकाने पाहणाऱ्या लोकांची गर्दी—यांच्यामुळें काऱ्यांना आपले हात स्वर्गाला पोचले असें वाटत असेल. पण आपल्याला—

तिला वाटलें, पुरुषांची नुसती बुद्धि बघून घ्यावी !

लगेच तिच्या मनांत एक नवी कल्पना चमकून गेली. ती स्वतःशींच उद्गारली, "पुरुषांना आपल्या बुद्धीचा एवढा अभिमान वाटतो. पण बायका हांहां म्हणतां त्यांना फसवूं शकतील."

ती स्वतःशींच हसली.

स्वतःला दिवस गेले आहेत हें तिच्या लक्षांत आलें, तेव्हां तर हें हसें अधिकच बाहेर फुटलें. मात्र तिनें प्रोफेसरांच्या कानांवर जेव्हां ही बातमी घातली तेव्हा धरणीकंपाचा धक्का बसल्यासारखी त्यांची मुद्रा झाली.

तरलेशीं परिचय होतांच संततिनियमनाच्या सर्व साधनांशीं त्यांनी तिची ओळख करून दिली होती.

*　　　*　　　*

ते कपाळाला हात लावून बसले.

"इतकं वाईट वाटायला काय झालं?" तरलेने प्रश्न केला.

"मग काय, मला मुलगा झाला म्हणून पेढे वांटत सुटूं!"

"आज नाही तरी उद्या वांटावे लागतीलच!"

"तर–तर! हे सारे संततिनियमनवाले लुच्चे आहेत लेकाचे! एकेकावर बेअब्रूची फिर्याद ठोकायला हवी!"

तोंडाला येईल तें कात्रे बडबडत होते. पण बडबडून या प्रश्नाचा निकाल लागणार नाही हें त्यांना ठाऊक होतें.

खूप विचार करून ते म्हणाले, "तुला बाहेरगावीं पाठविणार आहे मी!"

"हवा पालटण्याइतकी कांही माझी प्रकृति बिघडली नाही!"

जवळ येऊन क्रूर नजरेने तिच्याकडे पाहात ते म्हणाले, "माझ्या अब्रूची राखरांगोळी व्हायची वेळ आली आहे नी तुला हवापालटाचे डोहाळे लागले आहेत. तें कांही नाही. तुला इथुन बाहेर जायलाच हवं! बाहेरगावीं माझे एक डॉक्टरमित्र आहेत ते तुला चटकन् मोकळी करतील!"

तरलेच्या नजरेला नजर देण्याचा धीर न झाल्यामुळे प्रोफेसरसाहेब दुसरीकडे पाहूं लागले. थोड्या वेळाने त्यांनी तरलेकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले होते.

तिची पाठ थोपटीत ते म्हणाले,

"भित्री कुठली !"

तरला विकटपणाने हसली. आताचें तिचें हसणें काऱ्यांना मघाच्या तिच्या अश्रुपेक्षाहि भयानक वाटलें.

दुसरे दिवशीं तरला एकाएकीं नाहीशी झाल्याचें कळतांच काणे गोंधळून गेले. तरला हें एक कोडें आहे असें त्यांना वाटूं लागलें.

या कोड्याचा उलगडा तिसरे दिवशीं त्यांना आलेल्या तिच्या पत्राने केला.

"प्रोफेसरसाहेब, परवा तुम्हीं तरलेला भित्री म्हटलेंत ; पण खरे भित्रे तुम्ही आहांत. अगदी मुलखाचे भ्याड आहांत तुम्ही !

तुमच्या जिभेच्या आतषबाजीला तरला भुलून गेली. तिला वाटलें, एवढा शूर मनुष्य आपला पाठीराखा असतांना तरलेने बंडखोर कां होऊं नये !

पण तुमची सारी बंडखोरी बडबडींत आहे ! मनानं तुम्ही नादान गुलाम आहांत ! अनाथ बालकांचा एवढ्या मोठ्या आवेशानं कैवार घेणारे तुम्ही ! पण स्वतःच्या विलासांतून जन्माला येणाऱ्या पोराचा पोटांतल्या पोटांत खून करण्याची सूचना तुम्हीं किती शांतपणानं केली ! तें पोर तुमच्या कीर्तीला काळिमा फासील असं तुम्हाला वाटलं ! होय ना ?

आग लागो तुमच्या त्या बेगडी कीर्तीला! बायका प्रीतीसाठी जगतात, कीर्तीसाठी नाही!

तुम्हाला नवल वाटेल— संततिनियमनाचीं साधनं वापरायचं मी आपणहून सोडून दिलं.

मला मूल हवं होतं. आई होण्यासाठी माझं मन हुरहुरत होतं.

माझ्या पोटांतल्या निरापराधी गोळ्याविषयी तुम्ही भयंकर बोललां तेव्हां माझ्या डोळ्यांत जे अश्रु आले ते भीतीचे नव्हते. ज्या व्यक्तीला मी मोठी मानून माझं सर्वस्व अर्पण केलं तिचा क्षुद्र ढोंगीपणा पाहून माझ्या डोळ्यांत तें पाणी उभं राहिलं होतं."

११

# खोल, खोल!—

पंधरा जूनला वसंत आणि शरद यांनीं त्या चार खोल्यांपैकीं दोन खोल्या आपल्या ताब्यांत घेतल्या. तसें पाहिलें तर एलएल. बी. च्या विद्यार्थ्यांना इतक्या लवकर येण्याची कांहीच जरूरी नसते. लेक्चर्स एक जुलैच्या मानानें सुरू होतात आणि नुसती टर्मच भरायची असली तर आणखी चार आठ दिवस उशीरा आलें तरी चालण्यासारखें असतें.

पण या दोघां मित्रांना बी. ए. च्या परिक्षेच्या वेळी केलेल्या अभ्यासाचा वचपा काढायचा होता. मधल्या मे महिन्यांत त्यांनी पुस्तकाला हात सुद्धां लावला नव्हता हें खरें. पण या दिवसांत खेड्यांत आंबे भरपूर मिळाले तरी त्यांनी चित्रपटांची उणीव कशी भरून निघणार! खेड्यांत सिगारेट

ओढण्याची सुद्धा चोरी ! कुणीतरी वडील माणसांना जाऊन सांगेल ही भीति ! चोरूनमारून तो आनंद लुटायचा म्हटलें तरी भिकारड्या खेड्यांत कॉलेज विद्यार्थ्यांना आवडणारी सिगारेट तरी कुठें मिळत असते ?

त्यामुळे या दोघां दोस्तांनी एलएल. बी. चा अभ्यास फार कठीण असतो अशी आपल्या खेडवळ आईबापांची खात्री करून देऊन बारा जूनलाच कॉलेजचें प्रस्थान ठेवलें दोन दिवसांत त्यांना हव्या तशा खोल्या मिळाल्या. पलीकडच्या दोन रिकाम्या खोल्यांतही दोनचार दिवसांत कुणीतरी विद्यार्थी रहायला येतील असें मालक म्हणाला होता. विद्यार्थ्यांशिवाय दुसऱ्या कुणालाही तो या खोल्या देत नसे.

वसंत आणि शरद यांना हें ऐकून फार आनंद झाला. ते मनांत म्हणाले:—पलीकडे संसारी मनुष्याचं बिऱ्हाड आलं तर एखाद्या खप्पड बाईचं दिवसांतून दहावेळां दर्शन घ्यायची पाळी आपल्यावर येईल, तिचीं पोरं रात्री अपरात्रीं रडून आपली झोंपमोड करतील, आपल्याला पत्ते खेळायची लहर आली तर शेजारी दोन गडी सुद्धां मिळणार नाहीत आणि आपल्या ओळखीची एखादी कमल अगर विमल आपल्या खोलींत गप्पा मारायला आली, 'सिगारेट हवी का?' म्हणून आपण तिची थट्टा केली नि तिनंहि गमतीनं ती घेऊन थोडासा धूर काढला तर शेजारच्या बिऱ्हाडांत हाहाःकारच उडेल! छे! या लग्न झालेल्या लोकांना प्रेमाची गोडी मुळींच कळत नाही ! मोठे अरसिक रुक्ष लोक असतात हे. नवऱ्यानं भाजी आणायची आणि बायकोनं ती शिजवायची हाच काय तो त्यांचा रोमान्स !

* * *

वसंत आणि शरद याना शेजारी आपल्यासारखेच तरुण विद्यार्थी यावे अशी फार इच्छा होती. पण योगायोग मोठा आडमुठा आहे. तो मनुष्याची इच्छा कधीच पाहात नाही !

सोळा जून दिवशीं संध्याकाळीं शेजारच्या खोल्यांतलें सामान येऊं लागलें. त्यांत पाळणा दिसतांच या दोघां मित्रांनी एक लांब सुस्कारा सोडला.

मालकाच्या सांगण्यावरून बी. टी. करितां आलेले एक संसारी मास्तर आपल्या शेजारीं येत आहेत एवढें त्यांना कळलें. त्यांच्या मनांतील आशा पुन्हा पालवली. हो, बी. टी. ला येणाऱ्या मनुष्याचीं बायको थोडी तरी नवीन पद्धतीची असलीच पाहिजे.

पण दुसरे दिवशीं सकाळीं सुपारीएवढा अंबाडा असलेली एक हडकुळी फिकट बाई एक लहान मूल घेऊन जेव्हां फाटकांतून आंत शिरली—

तेव्हां आंबट तोंड करून बसंत मनांत म्हणाला ' गंगावन फार स्वस्त मिळतात हें या बाईला कुणीतरी सांगायला हवं !'

शरदचें मनही कांही गप्प बसलें नव्हतें, तें म्हणत होतें— या पोराला कुंची काय घातलीय या अप्सरेनं ! चागलं लोकरीचं टोपरं घालायचं सोडून—छीः ! कमल आमच्याकडे चहाला येईल त्यावेळी हें ध्यान पाहून ती म्हणेल—ही खोली सोडून पळून कां गेला नाही तुम्ही ! ' ब्रम्हदेवाच्या सृष्टींत सौन्दर्याचा दुष्काळ पडला होता तेव्हांच ही बाई जन्माला आली असावी !

त्या बाईच्या मागून चारपाच वर्षांच्या एका मुलाचे बोट धरून सुमारें तीस वर्षांचा एक गृहस्थ फाटकांत शिरला. त्याने मिशा काढल्या नव्हत्या, फ्रेंचकट केला नव्हता, किंबहुना वाढलेले गवत कापून त्याचे टर्फ केलें तरच तें बरें दिसतें, याचीहि त्याला कल्पना नव्हती.

चिरंजीव आंत आले ते पंपाकडे धांवतच गेले.

चहाचे कप विसळणारा गडी पंपाचे पाणी काढीत होता. तें पाहून टाळ्या पिटीत तो मुलगा उद्गारला ' या पंपात किती पाणी भरलंय् हो बाबा ! नाहीतर आपली विहीर ! एक कळशी काढायला किती वेळ लागतो !'

शरद आणि वसंत यांच्या मनांत आलें–बाप आणि त्यांतून मास्तर ! मग हा मिशावाला मनुष्य थोडाच गप्प बसणार आहे ! आतां तो मुलाला एक व्याख्यान सुनावल्याशिवाय राहणार नाही.

त्यांचा तर्क अगदी बरोबर ठरला. बाप मुलाला सांगूं लागला, 'पंपांत पाणी नसतं राजा ! आपण दोर लावून कळशी विहिरींत सोडतो नि पाणी काढतो ना ! तसं यंत्रानं होतं इथं ! '

" इथं वर पाणी नाही ! " पंपाशीं खेळत खेळत राजाने विचारलें,

' छे, पाणी कधीं असं वर असत नाही ! '

' तें खोल कां असतं ! '

' पाणी वर असतं तर उन्हांनं सुकून गेलं असतं—अगदीं नाहींसं झालं असतं नि मग कुणाला प्यायला सुद्धां पाणी मिळालं नसतं, म्हणून देवानं तें जमिनीच्या पोटांत खोल खोल झांकून ठेवलंय् ! '

' खूप खोल खोल गेलं तर खूप पाणी मिळतं ! '

'हो ! नि तें पाणी फार फार गोड असतं म्हणे ! '

बापलेकाचा हा संवाद सुरू झाला तेव्हां शरद आणि वसंत गालांतल्या गालांत हसत होते. पण हीं गमतीचीं प्रश्नोत्तरें संपलीं, तेव्हां एखादें सुंदर दृश्य डोळ्यांआड व्हावें तसा भास झाला त्यांना !

मुलाला घेऊन बाप शरद्-वसंतांच्या खोल्यांपुढें आला आणि नमस्कार करीत म्हणाला, 'राजा, या काकांना नमस्कार कर !'

'बाय् बाय् !' राजाने सलामी दिली. 'वेडा कुठला !' त्याचा गालगुच्चा घेत वडील उद्गारले. आपल्या खोल्यांकडे जातांना वसंत आणि शरद यांना उद्देशून हसत हसत ते म्हणाले, 'आमचा राजा फार अवखळ आहे. तुमच्या खोलींत येऊन पुस्तकं बिस्तकं फाडील. याला अगदीं पाऊल टाकूं देऊं नका तिथं !'

'मी येणार !' राजाने गर्जना केली.

आणि दुसरें दिवशींच त्याने शरद–वसंताच्या खोल्यावर स्वारी केली. पंप, फुलें, ऊन, यांच्याविषयीं त्याने इतके गंमतीचे प्रश्न विचारले कीं, हसतां हसतां मुरकुंडी वळली त्या दोघांची ! एका घटकेंत कोपऱ्यांत टाकलेल्या सिगारेटच्या रिकाम्या पेटीचा त्याने वास घेतला, विमानाप्रमाणें माणूस कां उडत नाहीं हा प्रश्न विचारून त्यांना सतावून सोडलें, आपली धाकटी बहीण आईच्या पोटांत होती हा शोध त्यांना सांगितला, आणि आई आजारी असतांना तिला बरें वाटावें म्हणून खाऊला मिळालेले सारे पैसे आपण देवळांतल्या देवापुढें ठेवले नि ती बरी झाली हा चमत्कारही त्याने निवेदन केला.

पहिल्या भेटींतच राजा, शरद आणि वसंत यांचा जिगरदोस्त झाला.

पंधरा दिवसांनी कमल या दोघा मित्रांकडे चहाला आली. शरदच्या मांडीवर बसलेल्या राजाकडे पहात तिने विचारलें, 'हें शेंबडं पोर कुठून पैदा केलं ?'

शरद हंसत हंसत बोलून गेला, 'जिथं नाक आहे तिथं शेंबूड असायचाच ! नि मला वाटतं–बायकांनासुद्धां नाक असतं !'

हे शब्द तोंडांतुन बाहेर पडल्यावर आपण गप्प बसलों असतों तर बरें झालें असतें असें त्याला वाटलें. कमलची नि त्याची दोन वर्षांची ओळख होती. उलट राजाची दोस्त होती सारी पंधरवड्याची.

पण कमलची क्षमा मागावी असें मात्र त्याला वाटलें नाही. दोनचार दिवसांनी तो तिला फिरायला बोलवायला गेला. तेव्हां ती फणकाऱ्याने उतरली, 'मी नाही येत! त्या शेंबड्या पोराला घेऊन जा कीं फिरायला!'

दररोज संध्याकाळीं शरद राजाला फिरायला घेऊन जाऊं लागला.

*        *        *

राजाच्या बाललीलांनी त्या दोघांना मोहिनी घातली, एवढेंच नव्हे, तर त्याच्या आईबापांविषयीं सुद्धां त्यांना आदर वाटूं लागला.

बोलतां बोलतां जगन्नाथपंतांनी त्यांना आपली त्रोटक हकीगत सांगितली—पण ती राहून राहून या दोघा मित्रांना आठवे.

जगन्नाथपंतांनी जन्माला येउन सारे तीनचार चित्रपट पाहिले होते. अजून स्वतःचा एकसुद्धां फोटो काढून घेतला नव्हता त्यांनी. चार शर्ट नि तीन कोट एवढेच त्यांचे कपडे होते. पण—

आईबाप नसलेला जगन्नाथ वार लावून शिकला होता, शिकवण्यांच्या बळावर बी. ए. झाला होता. बी. ए. झाल्यावर आपल्यासारख्याच एका गरीबाच्या एकुलत्या एक मुलीशीं त्याचें लग्न झालें. हजार पांचशें हुंडा देणाऱ्या मुली त्याला सांगून आल्या होत्या. पन दारिद्र्याचें दुःख काय आहे यांची कल्पना असल्यामुळें त्याने बिनहुंड्याने गरिबाच्या मुलाशीं लग्न केलें. सासू—सासऱ्यांचें मनुष्यबळ आपल्याला मिळेल हीच काय ती या लग्नाच्या बाबतींत त्याची अपेक्षा होती. पण तीही दैवाने सफल होऊं दिली नाही. लग्न झाल्यावर लवकरच तीं दोघें वारलीं.

यंदा बी. टी. ला परवानगी मिळाल्यानंतर त्याची बायको टायफॉइडने आजारी पडली. या जीवावरल्या दुखण्यांतून नुक्तीच उठली होती ती! तिला व मुलांना कुठेंतरी चांगल्या हवेच्या ठिकाणीं ठेवायला जगन्नाथ तयार

होता. पण असा दोन बिऱ्हाडांचा खर्च आपल्याला झेपणार नाही म्हणून त्याची बायको अगदीं हट्ट धरून त्याच्या बरोबर आली होती.

*   *   *

जगन्नाथपंतांची ही हकीकत कळल्यानंतर वसंत आणि शरद हे त्या पति-पत्नींच्या संसाराकडे विलक्षण कुतूहलाने पाहूं लागले. आजारी बायकोला रात्रीं दोन मुलें संभाळणें शक्य नाही म्हणून पंत आपल्या खोलींत राजाला घेऊन झोपत, बारा वाजेपर्यंत वाचत बसत आणि रात्रीं अपरात्रीं राजा रडत उठला तरी त्याला थोपटून आणि गोड बोलून निजवीत हें लवकरच या दोघांच्या लक्षांत आलें. प्रकृति बरी नसतांनासुद्धां संसाराचा खर्च वाढूं नये म्हणून त्याची बायको किती दक्षतेने वागते हें कळायलाहि त्यांना कांही विचार करावा लागला नाही. जगन्नाथपंतांच्या कपडयांना स्वतः साबण घालून ते वाळल्यावर ती अशी इस्त्री करी की त्यांचे कपडे अगदीं हुबेहुब परटाकडून आलेल्या कपडयांसारखे वाटत !

या नवराबायकोविषयीं बोलतांना शरद आणि वसंत यांच्या मनाचा गोंधळ होऊं लागला. वेषभूषा नि केशभूषा यांच्या नवीन नवीन पद्धतीचा बायकोला पत्ताहि नव्हता. नवऱ्याने तिची शृंगारिक थट्टा केल्याचें दृश्यहि अगदीं दुर्लभ होते बायकोला घेऊन सिनेमाला जाणें, ही साधी गोष्ट या कुटुंबांत दोन महिन्यांत घडली नव्हती. मग दिलरुबा वाजविणें, काव्य-गायन अगर वाङ्मय चर्चा, चांदण्यातली सहल, इत्यादि गोष्टी दूरच राहिल्या ! नाटकें-कादंबऱ्या आणि कॉलेजांतलीं मुलें ज्याला प्रेम म्हणतात तें या नवराबायकोच्या आयुष्यांत कुठेंच दिसत नव्हतें. पण त्यांचें एकमेकांवर अतिशय प्रेम आहे याविषयीं शरद आणि वसंत यांना मुळींच शंका नव्हती.

असलें हें प्रेम असतें तरी कुठें हा प्रश्न मात्र त्यांना कांही केल्या सुटेना.

*   *   *

एके दिवशीं रात्रीं राजाच्या रडण्यानें ते दोघे मित्र एकदमच जागे झाले. मोठमोठ्याने किंचाळत होता तो! 'विंचूबिंचू तर चावला नाहीना पोराला! अशी शंका शरदने कांढतांच वसंताने दिवा लावला. घड्याळांत दोन वाजून गेले होते.

दोघेही दार उघडून बाहेर आले.

पंतांच्या खोलींतच राजा रडत होता. आंत पंत नि त्यांची बायको बोलत होती.

शरदने दार खडखडावून हांक मारली, 'राजा–'

'काका, काका' आंतून रडवा आवाज आला. लगेच पंतांनी दार उघडलें.

उघडलेल्या दारांतून धांवत येऊन राजाने शरदच्या पायाला विळखा घातला.

'काय झालं रे! वसंतानें विचारलें.

'बाबांनी मारलं!'

दोघांनाहि आश्चर्य वाटलें! राजा फार लाडका होता पंतांचा!

पंत हसत मुखाने पण सद्गदित स्वराने म्हणाले, 'हिला संध्याकाळीं ताप आलाय्! एक वाजेपर्यंत सारखी तळमळत होती! नुक्ता कुठें डोळा लागला तिचा! इतक्यांत हा रडायला लागला. तिची झोपमोड होऊं नये म्हणून याला गप्प करायला लागलों. अगदीं ऐकेना तेव्हां चापट लगावली. त्याबरोबर यानेंच भोकांड पसरलं झालं! ही उठून आली. मिळून काय दोन्ही घरचा पाहुणा उपाशी!'

पंतांच्या शेवटच्या वाक्याने सर्वांनाच हसू आलें.

पण राजा मात्र हंसला नाही. तो आईजवळ जाऊन तिच्या तोंडाकडे केविलवाण्या दृष्टीने पाहूं लागला.

पंतांची बायको त्याना म्हणाली, 'हा निजूं दे आता माझ्याकडे—सारा दिवस काम करावं लागतं आपणाला! थोडी तरी स्वस्थ झोप मिळायला नको का माणसाला!'

पंत म्हणाले 'आतां नाही मला झोप यायची! अंथरुणावर लोळत पडण्यापेक्षां वाचत बसलेलेच बरं!'

राजाचा हात धरून पंत पंपाकडे गेले.

त्यांनी पंप हालवून तोंड धुवायला सुरवात केली.

त्यांचें तोंड धुणें संपतांच राजाने हट्ट धरला, 'मी पाणी काढणार!'

पंतांनीं त्याला उचलून धरलें, राजाने त्यांच्या मदतीने पंप हलवायला सुरवात केली. खळखळ पाणी वाहूं लागलें.

शरद आणि वसंत यांना वाटलें तें पाणी 'खोल' 'खोल' असे कांही तरी गात आहे.

त्यांनी पंताच्या बायकोकडे पाहिलं!

तिलाहि तेंच शब्द ऐकूं आले असावेत! ती हळूंच पुढें आली आणि राजाला घेऊन गेली.

# १२

## ज्योति !—

त्या चित्राचें नांव होतें 'रंगमंदिर.'

तें सुंदर चित्र पाहून क्षणभर दोघांचेंही भान हरपलें. थोड्या वेळाने राणी म्हणाली 'या चित्राला शोभेल अशी सुंदर चौकट कुठं मिळणार ?'

राजाही विचारांत पडला. चौकटीवांचून चित्र फार दिवस टिकणार नाही हें उघड होतें. पण—अमृत सोन्याच्याच पेल्यांत ठेवायला हवें.

आपल्या राज्यांतल्या सर्वांत उंच अशा सागवानाची चौकट राजाने मुद्दाम तयार करविली. ती चौकट रंगवायला आणि तिच्यावर नक्षी करायला राज्यांतले सर्व उत्कृष्ट कलावंत गोळा झाले होते.

अशा अपूर्व चौकटांत बसविलेलें तें सुंदर चित्र पाहून राजकवि उद्गारले 'समसमा संयोग हा जाहला !'

*          *          *

कालाच्या ओघांत त्या चित्रांतले रंग हलु हलु फिके पडूं लागले.

राजा आणि राणी यांना मनस्वी दुःख झालें.

आणखी कांही दिवस लोटले. तें चित्र—रम्य सायंकालाचें आतां अंधाऱ्या रात्रींत रूपांतर झालें होतें.

त्या चित्राकडे कुणी ढुंकून सुद्धां बघेना.

राजान तें चौकटींतून काढून दूर फेकून देण्याची आज्ञा केली.

*          *          *

ती शोभिवंत चौकट जागच्या जागींच होती. तिला शोभणारें चित्र राजेसाहेबांना हवें आहे असें कळतांच सर्व चित्रकार आपली सुंदर चित्रें घेऊन राजधानींत धावत आले.

चित्रें पाहतां पाहतां राणीची दृष्टि एका चित्रावर खिळून गेली. त्या चित्राचें नांव होतें 'मंदिर' !

राणीने राजाकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहिलें. राजा चौकटीकडे पाहत म्हणाला 'हें चित्र या चौकटींत बसणार नाही. चित्रांतल्या या देवळाचं शिखर कापून टाकलं तर कदाचित्'—

चित्रकारानें आपलें चित्र राजाच्या हातांतून खसकन् मागें ओढून घेतलें.

*          *          *

राणीने कुठलेंही सुंदर चित्र पाहून राजाकडे मान वळविली कीं तो चौकटीकडे पाहूं लागे. पण राणीला आवडलेलं एकही चित्र त्या चौकटींत बसेना.

'मनुष्य' या चित्रांत एक उंच उंच जाणारी ज्योति भोंवतालचा भयंकर अंधार उजळीत आहे असें दृश्य होतें. पण हें चित्र चौकटींत बसविण्याकरतां त्या ज्योतीच्या नृत्याचा वरचा भाग कापणें आवश्यक होतें.

'तांडव' या चित्रांत सागराच्या प्रक्षुब्ध लाटा अशा रीतीने रेखाटल्या होत्या कीं त्यांतून भुकेल्या माणसांच्या संतापलेल्या मुद्रा व्यक्त व्हाव्यात. पण न मावणारा भाग कापून तें चित्र चौकटींत बसविलें असतें तर त्या लाटा समुद्रांतल्या न वाटतां तळ्यांतल्या वाटल्या असत्या.

चौकट तयार करून घेण्याकरितां आपणांला किती कष्ट पडले याची जाणीव राजाने राणीला करून दिली. आणि शेवटीं त्या चौकटींत बरोबर बसेल अशाच चित्राची त्याने निवड केली.

त्या चित्राचें नांव होतें—'चिमणीं फुलें!' हिरवळीवरल्या चिमुकल्या फुलांचें चित्र होतें तें!

*                *                *

दुसरे दिवशीं सकाळीं तें चित्र जमिनीवर फडफडत असलेलें आढळून आलें. त्याची चौकट कुणीतरी मोडून तोडून तिचे तुकडे जवळच फेकून दिले होते.

राजाने रागाने अपराध्याला आपल्या समोर आणण्याची आज्ञा सेवकांना केली.

एका क्षणांत राणी त्याच्यापुढें येऊन उभी राहिली.

*                *                *

राणीने हा गुन्हा करावा याचें राजाला फार आश्चर्य वाटलें. त्याने संतापाने प्रश्न केला 'तूं ही चौकट मोडलीस?'

'हो!'

'कां? ही वाईट होती म्हणून?'

'नाही! मला दुसरी चौकट हवी आहे म्हणून!'

'दुसरी? कशासाठीं?'

राणीने राजापुढें एक चित्र धरलें. त्याच्यांत एक ज्योति उंच उंच नृत्य करीत भोंवतालचा अंधार उजळून टाकत होती!

१३

## मधली भिंत !—

मनुष्याच्या मनांत किती अतृप्त इच्छा सुप्त असतात! पोटाच्या पाठीमागे लागून चार वर्षांपूर्वी मी प्रयाग गाठलें. पहिले चारसहा महिने स्थिरस्थावर होण्यांतच गेले. मग मात्र मनाला एक प्रकारची हुरहूर लागली. वाटे—मराठी जगापासून आपण कितीतरी दूर आलों आहों! आपली भाषा, आपल्या पद्धतीचा पोषाख, आपलें खाणेंपिणें यांत एक प्रकारची अवीट गोडी असते हें मी प्रयागला जाऊन शिकलों. तिथला गंगायमुनांचा संगम प्रेक्षणीय आहे असें कोणी खुशाल म्हणोत! मला तर तो संगम पाहतांना कऱ्हाडच्या प्रीतिसंगमाची राहून राहून आठवण होई. कित्येकदा मामांची, मामींची नी सिंधूची आठवण होऊन मन फार उदास होऊन जाई. मनांत येई गंगायमुनांच्या संगमाला लोक इतके पवित्र कां

मानतात कुणाला ठाऊक ! डोळ्यांत उभ्या राहणाऱ्या गंगायमुना काय मोठ्या सुखाच्या असतात ?

माझ्या शेजारीं राहणारी बारातेरा वर्षांची बालिका अरुणा ही माझी मोठी मैत्रीण झाली होती. तिला गणिताचा मनस्वी कंटाळा होता. घरीं तिचीं उदाहरणें मीच सोडवून देत असल्यामुळे साऱ्या जगांत माझ्यासारखा चांगला मनुष्य नाही असें तिनें मत होणें स्वाभाविकच होतें.

घरीं आईनें कोणताहि चांगला पदार्थ केला, की ती तो हटकून मला आणून देई. तिला वाईट वाटूं नये म्हणून तो मी नाक न मुरडतां अगर तोंड वेडेंवाकडें न करतां खात असे हें खरें; पण तो खात असतांना माझ्या मनापुढून कोणकोणतीं चित्रें नाचत जातात याची त्या भोळ्या बालिकेला कल्पनाहि येत नसावी ! तिने आणून दिलेला गुलाबजम्मु समोर असला तरी मला कऱ्हाडच्या कोंदट स्वयंपाकघरांतील खरपूस थालीपिठाची आठवण होई ! समोर अरुणा उभी असतांना सिंधु नी मी मामींचा डोळा चुकवून एकमेकांचें लोणी कसें घेत असूं याचें चित्र माझ्या डोळ्यांपुढे उभें राही.

सिंधु अरुणेएवढी असतांना मी पोरका होऊन मामांच्या घरीं राहायला गेलों. त्यामुळे अरुणेला पाहिली की हटकून सिंधूची मला आठवण येई. आम्ही दोघेंहि जवळजवळ एकाच वयाचीं होतों; पण मी सिंधूपेक्षा एक वर्ष पुढे असल्यामुळे असो अथवा वर्गांत माझा पहिला नंबर असल्यामुळे असो, तिला माझ्याविषयी मोठें प्रेम वाटे. मला सख्खी बहीण नव्हती आणि तिला सख्खा भाऊ नव्हता हेंहि कदाचित् आमच्या या गट्टीचें कारण असूं शकेल ! कारण कुठलेंहि असलें तरी कऱ्हाडला सिंधूच्या सहवासांत घालविलेली चारपांच वर्षे मी कधीच विसरलों नाही. अलाहाबादला आल्याबर अरुणेची नी माझी ओळख झाली, तेव्हा तर सिंधूची मुग्ध मूर्तीच माझ्याभोंवती वावरते आहे की काय असा मला भास होऊं लागला.

मी अलाहाबादला आलों त्याच वर्षी सिंधूचें लग्न झालें. तिच्या लग्नाला येण्याविषयी मामांचें मोठें आग्रहाचें पत्र आलें. माझीहि जाण्याची खूप इच्छा होती पण या जगांत गुलामाच्या इच्छेला विचारतो कोण? मला चार दिवसांची सुद्धा रजा मिळाली नाही. सिंधूताईला भेट म्हणून मी कांही पुस्तकें पाठविलीं आणि पत्रात लिहिलें—

"ताई,

तुझ्या नी माझ्यामध्ये एक उंच भिंत आली आहे. या भिंतीचं नांव नोकरी! ही भिंत ओलांडून तुझ्याकडे धावत यावं, तुझ्यावर मंगलाक्षता टाकाव्यात, अशी फार फार इच्छा होती मला! पण आज ती.कांही सफल होणं शक्य दिसत नाही. या भिंतीला कुठलीच शिडी लागत नाही. तसाच चढायला लागलों तर मधेच हात सुटून खाली पडेन आणि पाय मात्र मोडून घेईन! क्षमा कर मला. मात्र लग्नाच्या वेळीं तुझी थट्टा करण्याचा माझा हक्क मी राखून ठेवीत आहें. तुझी माझी गाठ पडेल तेव्हा तूं म्हातारी झाली असलीस तरी तुझी थट्टा केल्यावांचून राहणार नाही मी!"

दोन महिन्यांनी तिचें छोटेंच पण मोठें गोड पत्र आलें. तिने लिहिलें होतें,

"तूं माझ्या लग्नाला आला नाहीस म्हणून मी मात्र तुझ्या लग्नाला आल्याशिवाय राहणार नाही हं! कांही झालं तरी करवलीचा हक्क आहे माझा! तुझ्या भिंतीबिंती मला नीटशा कळत नाहीत. पण गंमत म्हणून विचारतें, भिंतीला एकहि खिडकी नसतें वाटतं? बाकी तूं कांही कमी वितंडवादी नाहीस म्हणा! तूं म्हणशील, 'अहो आजीबाई, खिडकी असून काय उपयोग? त्या खिडकीला चांगले भरभक्कम लोखंडी गज आहेत ना?

"तूं लग्नाला आला असतास तर किती किती बरं झालं असतं! त्यांची नी तुझी ओळख झाली असती. फार गोड आहे हं स्वभावानं स्वारी! हें वाचून

तूं आपल्याशींच कसे डोळे मिचकावशील आणि मनांतल्या मनांत माझी कशी थट्टा करशील याची पूर्ण कल्पना आहे मला. पण थट्टेला भिऊन खरं लपवायचं असतं थोडंच !

"कांटे नसलेला गुलाब तूं कधी बघितला आहेस का ? नाही ना ? तो पाहायला आमच्याच घरीं–! जाऊं दे बाई तें ! माझ्या एकेका शब्दावर ग्रंथ रचीत बसशील तूं. मालवणला आमच्या घरीं खूप माणसं आहेत. मामंजी, सासूबाई, दोन दीर, तीन नणंदा–या साऱ्यांची लाडकी आहे हं मी ! स्वारीला मुंबईला नोकरी लागली आहे ! कुठल्याशा शाळेंत मास्तर आहेत. तूं लग्नाला यायचं चुकविलंस तरी आम्ही मुंबईला बिऱ्हाड केल्यावर भाऊबीज कांही चुकवितां यायची नाही हं तुला."

गेल्या तीन वर्षांत सिंधूची कुठलीहि भाऊबीज मी चुकविली नाही. अगदी आठवणीने तिला दहा रुपये मी पाठवीत असें पण अशा वेळीं या यांत्रिक भाऊबीजेचें मला हसूं आल्यावांचून राहात नसे. भाऊबीजेला भावाने भेटून ओवाळणी घातल्यामुळें होणारा आनंद पोस्टमनने आणून दिलेली मनिऑर्डर दोन सह्या करून घेतांना होणें शक्य तरी आहे का ? सुंदर तबकांत निरांजनांच्या हसऱ्या ज्योति हसत आहेत आणि बहिणीने आपल्याला मंगल कुंकमतिलक लावला आहे या मधुर दृश्याचा आनंद भावाला मनीऑर्डरीच्या टीचभर पावतीच्या रूपाने मिळूं लागला तर—छेः ! माझ्या पत्रांतल्या भिंतीची सिंधूने कितीहि थट्टा केली तरी ही मधली भिंत फार भयंकर आहे यांत शंका नाही. भावनांचे वारें खेळतें राहील असा लहानसा झरोकासुद्धा तिला नाही.

अशा वेळी माझ्या मनात एक विचित्र कल्पना चमकून जाई ! आजचें आपलें आयुष्य हा मोठा तुरुंग झाला आहे. तुरुंगांतल्या कैद्यांना कसली आली आहे भाऊबीज ! तुरुंगांत दोन माणसांच्या मधे एक भिंत

असली तरी ती एकमेकापासून कायमचीं दुरावल्यासारखीं होतात. मग या सामाजिक तुरुंगांत मी तर सिंधूपासून शेंकडो मैल दूर आहे! केंव्हाल्या कसली आली आहे भाऊबीज?

*     *     *

साडेतीन चार वर्षांच्या सक्तमजुरीनंतर मला कष्टाने रजा मिळाली. पण ती दहा दिवसांची! खाजगी नोकरीत मालकाचा शद्ब म्हणजे प्रीव्हि-कौन्सिलचा निकाल! दहा दिवस तर दहा दिवस! चोराच्या हातची लंगोटी सोडण्यांत अर्थ नाही असा पोक्त विचार मी केला. मुंबईहून तुझ्यासाठी फक्कड पातळ आणतों असें सांगताच अरुणेच्या डोळ्यांतलीं आसवें कुठल्या कुठे दडलीं! तिचा निरोप घेऊन मुंबईला येईपर्यंत माझ्या मनांत एकच विचार घोळत होता—जवळजवळ चार वर्षांनी आपण मुंबईला जातोंय्, खिशांत चार पैसेहि आहेत, आता चार दिवस जिवाची अगदी मुंबई करायची!

माधवाश्रमांत पथारी टाकून मी यथेच्छ भटकायला सुरवात केली. सकाळ-संध्याकाळ आवडत्या इराण्याच्या दुकानातला चहा घ्यायचा, मधल्या वेळेला ठरलेल्या दुकानात थालीपीठ चापायचें, लहर आली की आइस्क्रीमने अंतरात्मा शांत करायचा, चौपाटीवरल्या वाळूंत लोळत चणे मुरमुरे तोंडांत टाकायचे, इत्यादि कार्यक्रम मीं अगदी ठरवून टाकले होते. तीरावर तडफडणारा मासा पाण्यांत येऊन पडावा तसें तीनचार दिवसांत वाटूं लागलें मला!

दररोज दोन अगर तीन चित्रपट पाहायचे, हाहि माझ्या कार्य-क्रमापैकी एक महत्वाचा भाग होता. त्यातल्या त्यांत मराठी चित्रपट मी मुद्दाम पाहात होतों. चवथ्या का पांचव्या दिवशी मी असाच एक चित्रपट पाहायला गेलों. जायला जरा उशीर झाल्यामुळे अंधारांतच मी एक खुर्ची पटकावली. पलीकडेच दोन माणसें बसलीं होतीं. त्यांचें चित्रपटाकडे बेताचेंच लक्ष असावें. चित्रपटांत एका नखरेल नटीचें काम होतें. ती जेव्हा

जेव्हा पडद्यावर येई तेव्हा तेव्हा ते दोघेहि अगदी भुकेल्या डोळ्यांनी तिची प्रत्येक हालचाल पाहात व तिच्या रंगेल अभिनयाने खूष होऊन आपापसांत कुजबुजत! विश्रांतीपर्यंतच्या वेळांत त्यांनी आपल्या उत्तान आनंदाचें इतक्या वेळां प्रदर्शन केलें, की अस्सल मवाल्यांच्या खुर्चीला खुर्ची लावून तर आपण बसलों नाही ना, असा विचार माझ्या मनांत आल्यावांचून राहिला नाही. त्यामुळे विश्रांतीच्या वेळीं दिवे लागतांच मी माझ्या शेजारीं बसलेल्या व्यक्तीं-कडे पाहिलें— चांगले सद्गृहस्थ दिसत होते ते. माझ्याजवळचा मनुष्य तर अत्यंत सभ्य दिसत होता. छानछोकी अथवा रंगेलपणा यांची कुठलीहि निशाणी त्यांच्या चेहऱ्यावर दिसत नव्हती.

माझ्या डोळ्यांनी आणि माझ्या कानांनी मला फसविलें तर नाही ना, अशी शंका क्षणभर माझ्या मनांत येऊन गेली; पण दुसऱ्याच क्षणीं तिचें निरसन झालें.

माझ्या शेजारच्या सभ्य गृहस्थाचा दोस्त म्हणाला "चवथ्यांदा चित्रपट पाहातांनासुद्धा या नटीवर खूष आहों बुवा आपण!"

आपला मित्र बोलत नाही असें पाहून तो पुढे म्हणाला, "कसला रे विचार करतोयूस? या नटीचा?"

माझ्या शेजारचा सभ्य गृहस्थ नुसता हसला. त्याचा दोस्त सिगरेटचा धूर सोडीत उद्गारला, "आयुष्यांत आपली एकच इच्छा आहे बुवा! असल्या नटीच्या हाताचं चुंबन घ्यायला मिळावं!" मला वाटलें, माझ्या शेजारचा सभ्य गृहस्थ आपल्या सोबत्याची चांगली कानउघाडणी करील! पण त्याने तर हसून त्याच्या उद्गारांचें कौतुकच केलें!

त्या दोघांचा विलक्षण तिटकारा वाटूं लागला मला.

चित्रपट सुरू झाला. आपल्या आवडत्या नटीच्या सुंदर अंगविक्षेपांचें अवलोकन करण्यांत ती दुकल पुन्हा गुंग झाली. माझें मन मात्र हळूहळू कथानकांत रमूं लागलें. त्या कथेंत एक भाऊ बहिणीसाठी फार मोठा स्वार्थ-त्याग करतो असें दाखविलें होतें.

त्या भावाचा हृदयस्पर्शी त्याग पाहतां पाहतां मला सिंधूची आठवण झाली. मुंबईत चार दिवस चैनींत घालविण्यापेक्षा सिंधूला भेटून यावें या इच्छेने डोकें वर काढलें. ती मुंबईत असेल, कऱ्हाडला मामांच्याकडे असेल की मालवणला असेल? कांहींच कळेना! आपल्या नवऱ्याचा मुंबईचा पत्ता तिने मला केव्हाच कळविला नव्हता. तेव्हा आधी कऱ्हाडला जावें असें मी ठरविलें. कऱ्हाडला कळलें की सिंधु नेहमी मालवणलाच असते. अजून तिच्या नवऱ्याने मुंबईला बिऱ्हाड केलें नव्हतें.

लग्न होऊन तीनचार वर्षें होत आलीं तरी सिंधूच्या नवऱ्याने मुंबईला बिऱ्हाड कां करूं नये? मी मनांत म्हटले, 'बायकोला दूर ठेवून पोस्टाची, खानावळीची नी डॉक्टरची भर करण्यापेक्षा तेवढ्या खर्चांत मुंबईला बिऱ्हाड करतां येईल हें कसें सुचलें नाही सिंधूच्या नवऱ्याला!'

सिंधूविषयी मी मामींच्याकडे मुद्दाम चौकशी केली. नवऱ्याचें तिच्यावर फार प्रेम आहे, तिच्या सासरचीं सारीं माणसेंहि स्वभावाने गरीब आहेत हें ऐकून तर मालवणला केव्हां जाईन असें झालें मला!

मालवणपर्यंतच्या प्रवासांत सिंधूची थट्टा कशी करायची हें मी मनांतल्या मनांत ठरवीत होतों. पण तिच्या घरांत पाऊल टाकून मी तिला पाहिलें मात्र— मनांतली सारी थट्टा कुठल्या कुठे नाहीशी झाली! तिच्या मुद्रेवर कसली तरी कारुण्याची छाया पसरली होती. तिची लग्नापूर्वीची हसरी

मूर्ति नेहमी माझ्या डोळ्यांपुढे असल्यामुळेच हें, अंतर चट्‌कन्‌ माझ्या लक्षांत आलें असावें !

दुपारीं सिंधु नी मी बोलत बसलों. बोलतां बोलतां मी म्हणालों, "मी आलों म्हणून तुला आनंद व्हायला हवा होता!"

"नाही झाला म्हणून कुणीं सांगितलं तुला?"

"तूं." मी तिच्या मुद्रेकडे रोखून पाहात उद्‌गारलों.

"वराच आहेस की रे! आनंद झाला म्हणून काय गाणं म्हणायला लागूं की नाचत सुटूं? कांही झालं तरी सासुरवाशीण आहे मी."

"लाडकी सासुरवाशीण. होय ना?"

ती नुसती हसली; पण तें हसणें पारिजातकाच्या कोमेजलेल्या फुलासारखें वाटलें मला. कुणाला ठाऊक! माझ्या मनाचाहि तो खेळ असेल!

पतिराजांविषयीच्या गोष्टी काढून सिंधूची कळी उमलेल असें मला वाटलें; पण चारपांच प्रश्नांचीं उत्तरें मिळतांच माझ्या लक्षांत आलें—सिंधूचें मन आता कळीसारखें राहिलें नाही. तर त्याचें निर्माल्य झालें आहे.

माझ्या मनांत नाही नाही त्या विचित्र कल्पना येऊन गेल्या. मामी म्हणाल्या होत्या—'सिंधु फार सुखी आहे.' तिची सासू तर शुद्ध गायत्रीच होती. सासरा, दीर, नणंदा सगळ्या माणसांना सिंधु हवीहवीशी वाटते हें मी तर डोळ्यांनी पाहत होतों. मग!—

कोडें अधिकच बिकट होऊं लागलें. मला तर उद्या परत जाणें भागच होतें. मीं सिंधूला मुद्दामच म्हटलें, "सिंधु, पायांत काटा मोडला तर तो काढून घेणं बरं! नाही तर काट्याचा नायटा होतो!"

"पण काटा मोडला असला तर ना?"

" उगीच नाही कुणी लंगडत चालत !"

ती पुन्हा खिन्नपणाने हसली. मी एकदम बोलून गेलों, "माझ्या गळ्याची शपथ आहे तुला. काय झालंय् तें खरं सांग मला ?"

तिचे डोळे पाण्याने भरून आले. हुंदका दाबीत ती म्हणाली,

"शपथा विसरायला कांही वेळ लागत नाही पुरुषांना !"

ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. दुःखाचा कढ ओसरल्यावर एका हातरुमालांत बांधलेलें पत्रांचें पुडकें ती घेऊन आली. तीं पत्रें भराभर चाळून त्यांतलीं चारपांच पत्रें तिने माझ्यापुढे टाकलीं. तिला हसविण्याकरिता मीं म्हटलें,

" आपण नाही बुवा वाचणार हीं पत्रं !"

" कां ?"

" दुसऱ्याचीं प्रेमपत्रं वाचणाराचा प्रेमभंग होतो म्हणे !"

" प्रेमपत्रं नाहीतच हीं ! हे दगड आहेत !"

" दगड !

* * *

माझ्या प्रश्नाला सिंधूने कांहीच उत्तर दिलें नाही.

तिने माझ्यापुढे टाकलेल्या पांच पत्रांतलें पहिलें उचलून मी तें वाचूं लागलों.

" प्रिय उषा,

लग्नांत तुझं नांव भागीरथी ठेवावं असं आईचं म्हणणं होतं माझ्या आजीचं तें नांव होतं म्हणे. पण एरवीं वडील माणसांचं मन मीं कधीहि मोडलं नसलं, तरी या बाबतींत मात्र मी माझाच हेका चालविला.

आणि मीं ठेवलेलं नांव किती बरोबर आहे याची कल्पना काल बोटींत पाऊल टाकल्यापासून मला येत आहे. आपण अंधारांत चाचपडत आहोंत असं एकसारखं मनाला वाटतंय्. ज्याची उषा हरवली त्याची स्थिति अशीच होणार नाही का !

तुला मुंबईला घेऊन यावं म्हणून मी किती धडपडलों ! पगार कमी असला तरी आम्ही दोघं सुखानं राहूं, मजुरांचीं कुटुंबं नाही का मुंबईत राहात, असं बाबांच्या तोंडासमोर विचारण्यापर्यंत माझी मजल गेली. पण --

दररोज रात्रीं साडेदहा वाजतां एकमेकांना हांक मारून निजायचं असं आपण ठरविलं आहे. ध्यानांत आहे ना ? हा प्रेमाचा रेडिओ आहे. आपण कितीहि दूर असलों तरी आपल्या हाका एकमेकांना ऐकूं आल्यावांचून राहणार नाहीत. यांत चुकायचं नाही हं ! एकमेकांच्या गळ्यांच्या शपथा घेतल्या आहेत आपण !

परवा रात्रीचीं तुझीं आंसवं अजून गालांवर ओघळताहेत असं वाटतं ! आणि ओठांना तर – अधिक लिहीत नाही. कदाचित् तुझ्या एखाद्या धाकट्या बहिणीच्या हातीं हें पत्र लागेल आणि मग तुझी लाजतां लाजतां पुरेवाट होईल !

शिकवण्या मिळविण्याची खटपट मी करणार आहेच. फार फार तर चारसहा महिने तुला मालवणला राहावं लागेल; पण लंघनानं कडकडीत भूक लागते ना ? या विरहानं आपलं प्रेमहि तसंच उत्कट होईल.

इतक्या दिवसांत एक गोष्ट तुला विचारायची विसरलोंच होतों. उषा, तुझ्यासारखी गोड मुलगी मला मिळाली यावरून मी मोठा सुदैवी

आहे हें सांगायला ज्योतिषाची जरूरी नाही. पण तूं? मी पूर्वजन्मीं असं कोणतं पुण्य केलं होतं म्हणून तुझ्यासारखी –

पुढे घालायला योग्य असा शब्दच भाषेंत नाही. तेव्हा इथंच थांबतो.

तुझाच,

**प्रभाकर.**"

असल्या पत्राला सिंधूने दगड म्हणावें? मला कांही तर्कच करतां येईना.

मी दुसरें पत्र वाचूं लागलों. पहिल्या पत्रानंतर सहा महिन्यांनी लिहिलेलें होतें तें!

"प्रिय उषा,

एकदोन चांगल्या शिकवण्या मला मिळाल्या आहेत. पण शाळेंतलं काम संभाळून या शिकवण्या करतां करतां जीव कसा अगदी मेटाकुटीला येतो. कित्येकदा तुझी आठवण होऊन वाटतं – देवानं गरिबांना पंख कां दिले नाहीत? उभ्या दिवसाचा शीण नाहीसा व्हावा म्हणून मी हल्ली वरचेवर चित्रपट पाहूं लागलों आहे. तेवढेच दोन तास मजेंत जातात. भोवतालच्या रुक्ष जगांतून एका रम्य जगांत प्रवेश केल्यासारखं वाटतं. या रुक्ष जगांतल्या सार्‍या गोष्टी मी चित्रपट पाहतांना विसरून जातों. याला अपवाद एकच आहे. तूं! पडद्यावरच्या नटीकडे पाहतां पाहतां मला वाटतं माझी उषा हिच्यापेक्षां कितीतरी मोहक आहे! चित्रपट काढणार्‍या लोकांना कुरूप स्त्रियांचं प्रदर्शन करायची हौसच असते की काय, अशीहि शंका येते मला एखादे वेळीं!

खोलींतला माझा सोबती सिनेमाचा पक्का षोकी आहे. सडाफटिंग आहे बिचारा! आज दहा वर्षं एका कचेरींत खर्डे घासतोय्! तो

म्हणताच, की सिनेमा नसता, तर हजारों कारकुनांनी आत्महत्या केल्या असत्या !

तूं मुंबईला आल्यावर दर आठवड्याला आपण दोघं सिनेमाला जात जाऊं. इथं कांही मालवणसारखं नाही ! नवरा राजा नी बायको राणी !

तुझाच

**प्रभाकर."**

मला वाटलें — या फुलाला दगड म्हणणाऱ्या सिंधूला वेड तर लागलें नाही ? मनांतल्या मनांत सिंधूला हसत मी तिसरें पत्र उघडलें. तारीख ? प्रभाकर मुंबईला जाऊन पुरें वर्ष होऊन गेलें होतें ! —

"प्रिय उषा,

हल्ली माझीं पत्रं वेळेवर येत नाहीत म्हणून तूं तक्रार करतेस पण तूंच साग, सकाळपासून संध्याकाळपर्यंत घाण्याला जुंपलेल्या मनुष्याला पत्रं लिहायला वेळ मिळावा तरी कसा ? इतका राबतोय् तरी इथं बिऱ्हाड करण्याचा धीर होत नाही मला.

उषा, पैसे कांही झाडाला लागत नाहीत. मी चैन फक्त एक करतों — सिनेमाला तेवढा जातों. तुला पाहण्याची हौस फेडून घेण्याचा हा एक विचित्र प्रकारच आहे म्हणेनास ! पडद्यावरली नटी माझी उषाच आहे अशी कल्पना कितीदा माझ्या मनांत येते म्हणून सांगूं !

माझं तुझ्यावरलं प्रेम कमी झाल्याचा संशय तुला कां यावा हेंच कळत नाही. वेडी ग वेडी ! तरी बरं, अगदीं समुद्रकाठीं राहतेस ! समुद्राला

ओहोटी लागली म्हणून कांहीं त्यानं पाणी कमी होत नाही. कळलं का उषाबाई?

तुझा

**प्रभाकर."**

चवथें पत्र! मी तारीख पाहिली. सिंधूचं लग्न होऊन दोन वर्षे झालीं असावीत.

"प्रिय उषा,

परवा सुट्टींत मी घरीं आलों. चार दिवस आनंदानं जातील अशी मोठी आशा होती मला! पण एकसारखी तुझी भुणभुण सुरु होती–'मुंबईला बिऱ्हाड करूं या!'

बिऱ्हाड करायला नको का आहे मला? पण मालवणच्या बिऱ्हाडाचा सारा खर्च चालवून पुन्हा इथल्या बिऱ्हाडाचा सारा खर्च चालविणं मला शक्य आहे की नाही याचा तूं क्षणभरसुद्धा विचार केला नाहीस.

माझे वडील मराठी शाळेंतले मास्तर होते. त्यांनी हाडांचीं काडं केलीं, मीठभाकरी खाऊन दिवस काढले म्हणून मला बी. ए. होतां आलं. आईबाप आणि भाऊबहिणी यांचे हाल करून मी संसारसुख भोगूं इच्छित नाही.

तुला मुंबईला आणायचं म्हणजे तुझे हालच करायचे की नाही? माझ्या हातून तें कधीहि होणार नाही. माझी मिळकत वाढूं दे मग आपण आपला टुमदार संसार मोठ्या आनंदानं थाटूं. लक्ष्मण रामाबरोबर वनवासाला गेला तेव्हा त्याची बायको अयोध्येंतच चवदा वर्षे राहिली होती! आणि तूं दोनच वर्षांत इतकी कंटाळलीस?

गंमत म्हणून माझ्या खोलींत मी अनेक सिनेमा-नटींचे फोटो हल्ली लावले आहेत. मला त्यांच्याप्रमाणं तुला शृंगारतां येईल तेव्हाच तुला इथं आणणं बरं! नाही का? नाहीतर ते सारे सुंदर फोटो हसून तुझी थट्टा करतील आणि म्हणतील, 'हीच का या खोलीची मालकीण? आमच्या सिनेमांत दासींचीं कामं करायलासुद्धा हिच्यापेक्षा बऱ्या मुली असतात!'

मी दुसऱ्या एखाद्या शाळेंत चांगल्या पगाराची नोकरी मिळतेय् का पाहतों. ती मिळाली तर—राणीसाहेबांचा रुसवा काढायला मीच मालवणला येईन.

तुझा

**प्रभाकर"**

पाचवें—शेवटचें पत्र! कंपित मनानेंच मी तें वाचूं लागलों. तीनचार महिन्यापूर्वीच आलें होतें तें पत्र!

"प्रिय उषा,

तुझं पत्र वाचलं. तुला बरं वाटावं म्हणून मी मुद्दाम मालवणला आलों; पण माझ्या येण्यानं तुला दुःखच झालं असं तुझ्या पत्रावरून दिसतं! तूं लिहितेस, 'तुमचं माझ्यावर कांही प्रेम राहिलं नाही आता!'

तूं हा तर्क कशावरून केलास तें कांही मला कळत नाही. पण खरं सांगूं? परवा तुझ्याकडे पाहून मलाही कांहीं फारसा आनंद झाला नाही. तीनतीन वर्षांनी माणसं बदलतात म्हणे! मलाहि तें खरं वाटूं लागलं आहे. लग्नानंतरची ती गोड उषा आणि परवा पाहिलेली आंबट तोंडाची उषा – या दोघी एकच आहेत हें कांही केल्या पटेनाच मला! त्या उषेनं कुठल्याहि सिनेमानटीला आपल्या सौंदर्यानं लाजविलं

असतं. पण आजची उषा — तुला पाहून कुणालाहि वाटेल, की ही बाई दोनतीन वर्षं तरी आजारी असली पाहिजे !

मीं खूप खटपट केली; पण अधिक पगाराची नोकरी मिळणं सध्या अशक्य आहे. हीच टिकली म्हणजे मिळविलं !

तुझ्यासारख्या तीनचार वर्षांत म्हाताऱ्या झालेल्या बायकोचा चेहरा दररोज संध्याकाळी पाहून माझा दिवसाचा शीण कसा नाहीसा होणार ? त्यापेक्षा पडद्यावर दिसणाऱ्या सिनेमा-नटी फार बऱ्या ! त्या नाचतात, गातात, हसऱ्या नजरेनं पाहतात, शेपटे नाचवितात—तुझ्यासारख्या रडव्या नसतात त्या !

तूं आपल्या पत्रांत एक विचित्र वाक्य लिहिलं आहेस—'तुमच्या नी माझ्यामधे कसली तरी उंचउंच भिंत कुणीतरी बांधली आहे असं मला वाटतं !'

मला या वाक्याचा अर्थच कळला नाही ! मला कसलंतरी व्यसन लागलं आहे अशी का तुझी समजूत झाली आहे ? आईच्या पायाची शपथ घेउन सांगतों, की मी अजून बीरच्या थेंबाला किंवा कुठल्याहि बाईच्या हाताला स्पर्शसुद्धा केलेला नाही !

प्रभाकर"

मी सिंधूकडे पाहिलें. तिचे डोळे पाण्यापेक्षाहि कारुण्याने भारावले होते. तें कारुण्य मला म्हणत होतें, "सिंधूला सुखी कर, कांही करून सिंधूला सुखी कर. सुखाची ओवाळणी तिला घाल !"

पण सिंधूच्या आणि सुखाच्या मधे केवढी गगनचुंबी भिंत उभी राहिली होती. या भिंतीचा एकेक दगड किती अजस्र होता !

पहिला दगड—मजुराप्रमाणे पदवीधरावरहि मिळेल त्या पगारावर राबण्याचा आलेला प्रसंग !

दुसरा दगड—सातआठ माणसांचें कुटुंब पोसण्याची प्रभाकरावर असलेली जबाबदारी !

तिसरा दगड—लग्नापासून सक्तीने नवऱ्यापासून दूर राहावें लागल्यामुळें सिंधूला आलेला दुर्मुखलेपणा !

चवथा दगड—वर्षानुवर्षे बायकोपासून दूर राहिल्यामुळे पडद्यावरल्या सुंदर स्त्रिया पाहण्यांतच आनंद मानायला लागलेली प्रभाकराची विकृत वृत्ति.

प्रभाकराचा फोटो पाहण्याची इच्छा मी सिंधूपाशी व्यक्त केली. तिने आणलेला फोटो पाहतांच—

त्या दिवशीं चित्रपट पाहतांना माझ्या शेजारीं बसलेला गृहस्थ प्रभाकरच होता !

मला त्याची कींव आली !

त्याचें मन विकृत झालें होतें खरें ! पण ती विकृति सिंधु आणि तो यांच्यामधे आलेल्या राक्षसी भिंतीनेच निर्माण केली होती ! नाही का ?

माझें मन म्हणत होतें, ही भिंत प्रभाकराने बांधली नाही, त्याच्या कुटुंबाने बांधली नाही, सिंधूने बांधली नाही !

ती भिंत एका राक्षसाने निर्माण केली आहे. माझ्यासारख्या परक्या माणसाने आपटून आपटून डोकें रक्तबंबाळ केलें तरी या भिंतीचा एक तुकडासुद्धा ढळणार नाही.

एकदम मला आठवलें—लग्नापूर्वी सिंधु शिवणकाम कसें छान करीत असे.

सिंधूचें सांत्वन करीत मी म्हटलें, " सिंधुताई, याला एकच उपाय आहे !"

केवढ्या आशेने तिने माझ्याकडे पाहिलें !

" हातांत मिळेल तें हत्यार घ्यायचं आणि ही मधली भिंत पाडायला लागायचं !"

सिंधू हसली.

"आज ना उद्या धरणीकंप होऊन ही भिंत कोसळून पडणारच आहे : पण तोंपर्यंत आपण स्वस्थ राहून चालायचं नाही !"

दुसरे दिवशीं सिंधु माझ्याबरोबर मुंबईला जायला निघाली तेव्हा तिच्या घरच्या मंडळींना जेवढे आश्चर्य वाटलें त्याच्यापेक्षाहि अधिक आश्चर्य तिला आपल्या खोलीच्या दारांत पाहून प्रभाकराला वाटलें.

त्याच्या तोंडांतून शब्द बाहेर पडण्याच्या आधीच सिंधूने त्याला प्रश्न केला,

" तुमच्या या सिनेमानटींचं शिवणकाम मला मिळेल ना ?"

# १४

## त्याचे अङ्क!—

मृदुलनं चिमण्या शैलाच्या डोक्याला तेल घातलें, तेलाचा हात आपल्या केसांना पुसला, गुलाबाच्या फुगीर कळीप्रमाणे दिसणाऱ्या शैलाच्या इवल्याशा तोंडाचा लाडकपणानें पापा घेतला. आणि मोत्यांची माळ अगदीं नाजुक हातानें मखमली पेटींत ठेवावी त्याप्रमाणे तिनें तिला पाळण्यांत ठेवलें.

शैला क्षणभर उताणी राहिली. लगेच उजव्या हाताचा आंगठा तोंडांत घालून ती कुशीवर वळली. 'मोठी लबाड होणार आहे ही पोरटी!' स्वतःशीच हंसत मृदुला उद्गारली.

पाळण्याच्या मच्छरदाणीचीं बटणें लावतां लावतां तिनें शैलाकडे पुन्हा पाहिलें. धांदुरक्या ढगांमधून अंधुक चमकणाऱ्या चंद्रकोरीची मृदुलेला आठवण झाली.

तिचें लक्ष उघड्या खिडकीकडे गेलें. तिथे मंद प्रकाश दिसत होता. चांदणे ?

मृदुला लगबगीने खिडकीकडे गेली.

*                *                *

खरेंच, कितीतरी दिवसांनी आकाशांत चंद्र उगवला होता.

तिचें तिलाच हंसूं आलें. चंद्र आकाशांत दररोज उगवत असलाच पाहिजे. पावसाळ्यांतल्या काळ्याकुट्ट ढगांमुळे तो आपल्याला दिसत नव्हता एवढेंच.

तिच्या मनांत आलें—आयुष्यांतला आनंद हा सुद्धा चंद्रासारखाच आहे. स्वतःच्या प्रकृतीच्या दृष्टीने गेले पांचसहा दिवस आपण किती काळजींत काढले. दररोज सकाळीं ९९° नाहींतर १००° ताप आपला ठरलेला. शैलाला तर नुक्ता चवथा महिना लागलाय्. आपला ताप असाच राहिला तर पोरीला दूध मिळणार नाही—कदाचित् दुखणं बाळंतरोगावर जाईल—आपली दोन्हीं मुलें अगदी लहान आहेत—आपलें बरेंवाईट झालें तर त्यांना कोण संभाळणार ?

छेः ! किती किती भयंकर कल्पना एकसारख्या आपल्या मनांत थैमान घालीत होत्या ! रात्रीं ताप उतरला तरी मनांत येई—उद्यां ताप येणारच ! बाहेर आभाळ आणि आंत आपलें मन काळेंकुट्ट होऊन जाई. बाहेर पावसाच्या सरी येत. आंत आपल्या डोळयांतून अश्रु गळूं लागत. आणि बेडकांचें तें डरांव डरांव ओरडणें ऐकलें कीं—

हा पाऊस कधी बंद होता असें आपल्याला झालें होतें. शेवटी आज पहांटे पाऊस थांबला. सकाळीं ऊन हांसलें. आपल्यालाही हंसूं आलें. आनंदांनी आपलें टेंपरेचर पाहिलें. दररोज यावेळीं ते ९९ असे. आज मात्र तें ९७॥ च होतें.

बाहेरचें ऊन आनंदाच्या मुद्रेवरही नाचूं लागलें. 'हू, हू, हू,' करीत खेळणाऱ्या शैलाच्या मुठींत आपलें एक बोट अडकवून ते हंसत म्हणाले, "आज कामाला जातो मी! असलं मॉडेल पुन्हा मिळणार नाहीं."

शैलाने त्यांचें बोट आपल्या मुठींत कसें घट्ट आवळून धरलें होतें. आपण तें दाखवून म्हटलें, "लाडकी लेक सोडत असली तर जावें!"

'आईनं आपलं वकीलपत्र लेकीला दिलेलं दिसतंय्!'

किती गंमतीदार बोलतात ते!

हंसत हंसत आपण शैलाला उचललें नि तिचे मटामट मुके घेत म्हटलें 'काय पण वकील आहे! हू, हू, तेवढं करतां येतंय्!'

पण शैलाचं कौतुक करायच्या ऐवजीं आनंद म्हणाले 'दुपारीं जेवायला-सुद्धा येणार नाही मी! स्टुडियोतच कांहींतरी खाईन! आतां एकच दिवस ती बाई इथं आहे!'

'फार सुंदर आहे वाटतं ही बाई?' आपण थट्टेने म्हणालों. गेले सहा दिवस आपल्याला ताप येत होता. आज अजून आला नसला तरी उशीरा येईल. त्याचा काय नेम आहे? नि ताप नाही आला तरी आनंद स्टुडियोंत गेल्यावर शशिकांत काय आपल्याला स्वस्थ पडूं देणार होता? त्याच्यासारखा हट्टी नि अवखळ मुलगा मुलखांत सांपडणार नाहीं.

म्हणून आज सुद्धां जाऊं नका असा आपण हट्ट धरला. आनंद रागावलेले दिसले. तें पाहून आपल्या डोळ्यांत पाणी उभे राहिलें. लगेच तें पुसून ते म्हणाले 'वेडी कुठली! अगदी शैलाएवढी कुक्कुबाळ आहेस नाहीं रडायला!'

आपल्यासाठी ते सबंध दिवस घरीं राहिले.

फार दिवसांनी पिठासारखें चादणें पडलें होतें. जिभेवर द्राक्षाची गोडी रेंगाळावी त्याप्रमाणें सकाळच्या या प्रसंगाची माधुरी मृदुलेच्या मनांत तरंगत होती. तिला वाटलं—चांदणं पिठासारखं पडलंय् असं उगीच म्हणतात. पिठासारखं जर तें हातांत धरता आलं असतं तर आपण तें मुठी भरभरून उचललं असतं आणि मनांत भरून ठेवलं असतं.

पण लगेच तिच्या मनात आलें—आपल्याला हें उसनं चांदणं हवंय् कशाला ? आपल्या संसारात चादणंच फुललंय् कीं ! मुंबईच्या प्रदर्शनांत सुवर्णपदक मिळालेला चित्रकार नवरा, अगदीं चित्रासारखीं असणारीं दोन मुलं, स्वैंपाकी, गडी—काय कमी आहे आपल्याला ? आपली प्रकृति मधूनमधून बरी राहत नाही ! तेवढं सोडलं तर...

दूध काढतां काढता कासंडी भरावी नि तिच्या तोंडाशीं फेंस दाटावा तशी तिच्या मनाची स्थिति झाली.

ती झटकन् पाळण्याकडे आली, आरशासमोर उभे राहून तिने आपल्या केसावरून कंगवा फिरविला, संध्याकाळीं तोडून ठेवलेलं गुलाबाचं फूल केसांत खोंवलं, आणि पाळण्यांत शैला हलल्यामुळेंच की काय ‘ एकच पायाचा । बाळाचा । नाच गोड बाळ्याचा । ’ या ओळी गुणगुणत ती खोलीबाहेर पडली.

क्षणभर ती मधेंच थबकली.

तिच्या मनांत आलें—आनंदांना झोंप लागली असली तर—तर ?

शशि व्हायच्या आधीं मृदुला झोपली असली तरी ते तिच्या ओटावर हळूच ओठ ठेवून तिला जागें करीत नव्हते का ? आपणही—

जवळ जवळ नाचतच मृदुला आनंदाच्या शयनगृहांत गेली.

तिने मच्छरदानी वर करून पाहिलें. एकटा शशिकांत पाय पोटाजवळ घेऊन निजला होता. तो लोळत पलंगावरून खाली येईल म्हणून बाजूला तिनं चार उशा लावलेल्या होत्या.

मृदुलेला शंका आली—आनंद कुठे बाहेर तर गेले नाहीत ना? त्यांना चांदणें फार आवडतें. कदाचित् फिरायला गेले असतील ते! तिने पुढच्या दाराकडे येऊन पाहिलें. दाराला आंतून कडी होती.

मग?

स्वारी आपल्या अभ्यासाच्या खोलींत कांहीतरी वाचीत बसली असावी! डोळे बिघडूं नयेत म्हणून रात्रीं वाचणार नाही असें आपल्या-पाशीं कबूल करूनही—

आनंदाने मागचें दार नुसते ओढून घेतलें होतें तें उघडतां उघडतां मृदुलेने मनांत ठरविलें–खोलींत हळूच जायचें नि म्हणायचें 'एका माणसाची चोरी पकडली की नाही?'

मग आनंद हंसून म्हणतील 'चोराला शिक्षा करा कीं!'

'तीच करायला आलें आहें!' आपण उत्तर देऊं!

आणि मग—

मग ते म्हणतील–'मृदु, असली शिक्षा मिळायला लागली तर प्रत्येक माणूस उठल्यासुटल्या चोर होईल!'

मृदुलेचें हें गोड स्वप्न मनांतल्या मनांतच राहिलें. आनंदाच्या खोलीच्या दारांत तिने पाऊल टाकलें मात्र—ती स्तंभित झाली. तिच्या तोंडांतून शब्दच उमटेना.

कांहींतरी लिहितां लिहितां आनंद थांबला होता. त्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले असावेत. मृदुला दारांत आली तेव्हा त्याच्या डोळ्यांतून

दोन अश्रुबिंदु खालीं पडले. विजेच्या प्रकाशांत ते इतके विलक्षण चमकले की तुटून पडणारे दोन तारेच आपल्याला दिसले असा मृदुलेला क्षणभर भास झाला.

*　　　　*　　　　*

मृदुलेची चाहूल लागतांच आनंदाने दाराकडे पाहिलें. तो टेबलावरले कागद गोळा करूं लागला. आनंदाच्या अश्रूंचें कारण त्या कागदांत असलें पाहिजे हें मृदुलेने सहज ओळखलें. अगदीं राहवेनासें झालें म्हणजे मनांतल्या गोष्टी कागदावर लिहायच्या आणि एकदोन दिवसांनी ते कागद फाडून टाकायचे ही आनंदाची संवय तिला ठाऊक होती.

पुढें होऊन तिने आनंदाच्या हातांतले कागद काढून घेतले. त्याने क्षणभर ते हातांत घट्ट धरले होते. पण लगेच ते तिच्या हातांत देऊन तो म्हणाला 'आज चांदणं किती छान् पडलंय् नाही !'

चांदणें नि अश्रु !

आनंदाच्या मनांत एकाच वेळीं या दोन्हीना स्थान आहे !

हा प्रश्न सोडवीत हातांतले कागद वाचण्याकरितां मृदुला टेबलाजवळ आली. तिचें लक्ष समोरच्या दोन चित्रांकडे गेलें. एकाच दिवशीं तीं आनंदाने काढलीं होतीं. केशभूषा करीत बसलेली मृदुला आणि भांड्यांना कल्हई काढणारा कल्हईवाला !

त्या कल्हईवाल्याकडे मृदुलेला पाहवेना. त्याच्या फाटक्या अंगातला तो फाटका कोट, ते खोल गेलेले गाल, ती वाढलेली दाढी—छेः ! तिला आठवण झाली—आज तिसऱ्या प्रहरीं या कल्हईवाल्याची बायको आली होती. तो आजारी आहे म्हणून ती सांगत होती—

तिने कागदांकडे दृष्टि वळविली.

पहिल्या कागदावरलें पहिलेंच वाक्य किती विचित्र होतें—'प्रेम ही कर्तृत्वाच्या पायांतली बेडी व्हावी?'

*                *                *

मृदुला भरल्या डोळ्यांनी वाचीत होती—

' पहांटे मी स्वप्नांतूनच हंसत जागा झालों. पलीकडे शशिकांत गाढ झोंपीं गेला होता. त्याच्याकडे मी पाहिलें. गुलाम झोंपेंत हंसत होता. मीं मनांत म्हटलं—कशाचा बरें याला इतका आनंद झालाय्? काल संध्याकाळीं स्वारी विमानाचा हट्ट धरुन बसली होती. तें विमान स्वप्नांत त्याला मिळालें असावें!

पांच मिनिटापूर्वी मी सुद्धां अशाच एका स्वप्नांत रंगून गेलों नव्हतों का? मृदुलेच्या आजारीपणामुळं पांचसहा दिवस मी स्टुडियोंत गेलों नव्हतों. पण 'दोन भुका' हें चित्र एकसारखें डोक्यात घोळत होतें. योगा-योगानं मिळालेली ती बाई—इतक्या मादक डोळ्यांची बाई मॉडेल म्हणून मिळेल अशी कल्पनासुद्धां नव्हती मला! पण योगायोगानं ती मिळाली. चारपांच दिवस आठ आठ तास तिला पुढं उभी करून—'

तो कागद इथंच संपला होता. मृदुलेनं कपाळाला आठी घालून आनंदाकडे पाहिलें. तो बाहेरच्या चांदण्याकडे पाहत होता.

मृदुला त्याच्याजवळ जाऊन म्हणाली—

'हें मॉडेल हातचं गेलं म्हणून इतकं वाईट वाटतंय् हो!

उत्तरादाखल आनंद नुसता हंसला.

*                *                *

मृदुला वाचीत होती—

'माझ्या कलेच्या दृष्टीनं नि समाजाच्या दृष्टीनं हें चित्र अप्रतिम झालं असतं. पण--

मृदुलेचें मन मोडणें माझ्या जीवावर आलं. लग्न झाल्या दिवसापासून मी तिला फुलासारखें वागविलें आहे. हें फूल कोमेजूं नये म्हणून—

दुपारीं स्टुडियोतला नोकर मॉडेल पैसे घेऊन गेलें म्हणून सांगायला आला. त्यावेळीं असें वाईट वाटलें मला! क्षणभर गुदमरल्यासारखें झालें. मृदुलेवरलें आणि मुलांवरलें माझें प्रेम—या जगांत प्रेम सुद्धां अमर्याद असूं नये हेंच खरें!

जेवल्यावर वाचायला एक पुस्तक हातांत घेतलें. पण अक्षर सुद्धा वाचवेना. एकच प्रश्न डोळ्यांपुढें पुनःपुन्हां उभा राहत होता—मी प्रेम हें मानवी जीवनांतलें अमृत मानलें. मनुष्याचें कर्तृत्व अमर व्हायचें असेल तर त्याला प्रेमाचें प्रोत्साहन पाहिजे अशी माझी श्रद्धा होती. पण प्रेम हें अमृत नाही, तें मद्य आहे. हा अनुभव—

मद्याची बाटली फेंकून देण्याचा धीर मद्यप्याला कधीं होईल का? मलाही मृदुलेचें मन दुखवण्याची कल्पना सहन होत नाही. तिचे आजार, तिच्या लहरी, तिच्या संसाराच्या नि जीवनाच्या संकुचित कल्पना या सार्‍यांनीं माझ्या कलेचा विकास किती संकुचित केला आहे! पण साध्या-भोळ्या मृदुलेला याची कल्पनाही नाही. ती तिला आणून द्यायची म्हणजे--बिचारी अज्ञानांत सुखी आहे असें म्हणून मी गप्प बसतों.

एक मॉडेल गेलें म्हणून कांही कलावंताने रडायला नको हें मला कळतें. पण मधाशीं अंथरुणावर पडल्याबर तिसर्‍या प्रहरीं मागीलदारीं पाहिलेलें तें दृश्य सारखें समोर नाचूं लागलें—पिंजर्‍यांत पांखराने तडफडावें तसें मन निष्फळ फडफड करूं लागलें—

मृदुला आणि ती कल्हईवाल्याची बायको--

शशिकांताला तिच्या कल्हई काढण्याची गंमत वाटत होती. तो एकाग्र दृष्टीने सारें पाहत होता. मधेंच 'ताट चांदीचं झालं' म्हणून तो ओरडला. भाता दाबण्याकरतां तर त्याचे हात एकसारखे फुरफुरत होते.

त्याच्याबरोबर मीही त्या कल्हईवालीकडे पाहूं लागलों. तिच्या लुगड्याला सतरा ठिकाणीं ठिगळें होतीं. तिचा चेहराही फिक्कट दिसत होता. दोनतीन महिन्यापूर्वी मी तिच्या नवऱ्याचें चित्र काढलें तेव्हां ही त्याच्याबरोबर कुठे दिसली नव्हती. 'बायको कुठं आहे?' म्हणून मी त्याला विचारलं तेव्हां तो प्रथम नुसता हंसला होता आणि मग हळूच म्हणाला होता. 'बाळंत आहे ती, साहेब!'

कल्हईवाली बाळंतीण होऊन पुन्हां कामाला सुद्धां लागली आणि मृदुला---

अवखळ शशिकांत पडेल, धडपडेल म्हणून मृदुला मला महत्त्वाची कामें बाजूला ठेवायला लावून घरीं राहवून घेते आणि ही कल्हईवाली-- शशिकांताएवढाच असलेला तिचा मुलगा भाता दाबून तिला मदत करीत होता.

ती कल्हईवाली भांड्यांनाच नव्हे तर माझ्या जीवनविषयक कल्पनांनाच उजाळा देत आहे असें मला वाटलें. त्या नवरा-बायकोंत काय कमी प्रेम होतें? आमच्या संसारांतल्या अडचणी काय त्याच्यापेक्षां अधिक होत्या!

कल्हईवालीला मीं विचारलें 'नवरा कुठं गेलाय् ग आज?'

'घरींच हायत्!'

'का?'

'वाइच् बरं नाही त्यांना! त्येच येत व्हते कामाला! पन मी म्हणालों—तुम्ही विसावा घ्या आज. मी जातों कामाला!'

'तुझं धाकटं मूल कुठं आहे?' मी कुतूहलानं प्रश्न केला.

'घरीं हाय ना!' उत्तर देतांना तिने हंसत माझ्याकडे पाहिलें. तिची दृष्टी म्हणत होती—आज घरधनी आईचं काम करताहेत!

पुढें थोड्या वेळाने मृदुलेकडून पैसे घेऊन कल्हईवाली गेली हें मी पाहिलें. पण कांही केल्या माझ्या नजरेसमोरून ती हलेना. आणि जेवण झाल्यावर मी अंथरुणावर जाऊन पडलों तेव्हां तर—

'संसार यशस्वी व्हायला सौंदर्यापेक्षां सामर्थ्याचीच आवश्यकता अधिक आहे. मृदुला फुलासारखी आहे. पण फूल कितीही सुवासिक असलें तरी फळाची सर त्याला कशी येणार?'

मृदुला शेवटचा कागद हातांत घेऊन आनंदाजवळ गेली. ती हंसून म्हणाली 'या कागदाची पूजा करणार आहे मी!'

'कशानं?'

मृदुलेने तो कागद टेबलावर ठेवला आणि मघाशीं डोक्यांत खोवलेलें गुलाबाचें फूल काढून त्याची एकएक पाकळी ती कागदावर वाहूं लागली.

'मृदुला फुलासारखी आहे. पण फूल कितीही सुवासिक असलें तरी त्याला फळाची सर कशी येणार?' स्वतः लिहिलेले हे शब्द आनंदाच्या कानांत घुमू लागले. त्याचें मन कंपित झालें. त्याच्या डोळ्यांत एकदम पाणी उभें राहिलें.

हातांतल्या पाकळ्या संपतांच मृदुलेने आनंदाकडे पाहिलें. ती आश्चर्याने उद्गारली 'हें काय?'

'अश्रु! मघांचे दुःखाचे होते; हे आनंदाचे आहेत!'

१५

## प्रवासी !—

एका खडकावर पोटाशीं पाय धरून तो निजला होता!

अनंत कालाचा प्रवासी होता तो!

पहाटेच्या गार वाऱ्याने अंग शिरशिरतांच तो उठला. रात्रभर वाटचाल करायचा निश्चय केला असूनही आपल्याला मधेंच झोंप कशी आली याचें त्याला आश्चर्य वाटलें.

तो ताडकन् उठला आणि—

तो रखडत रखडत चालूं लागला. त्याचे अनवाणी पाय काळसर झालेल्या रक्ताने भरून गेले होते. चालतांना खडे लागले कीं त्याच्या पावलांचा कण नि कण विलक्षण वेदनांनी विव्हळ होत होता.

कंटाळून तो एका खडकावर बसला. त्याने सहज वळून मागें पाहिलें. तो भाग किती सुंदर दिसत होता. धुक्यातून दिसणारे झाडांचे हसरे शेंडे—आईच्या पदरा आडून डोकावून पाहणाऱ्या बालकासारखे भासले ते त्याला.

त्याने पुढें पाहिलें. धुक्यापलीकड कांहीच दिसत नव्हतें. अज्ञाताचा भयंकर सागर आपल्यापुढें पसरला आहे या कल्पनेने तो गोंधळून गेला.

आल्या वाटेनें परत जावें म्हणून त्याने तोंड सुद्धां फिरविलें!

इतक्यांत एकदम ऊन पडलें. धुकें भराभर विरळ होऊं लागलें. आपल्या डोळ्याबर बांधलेली पट्टी कुणीतरी सोडीत आहे असें त्याला वाटलें.

चालून आलेल्या वाटेकडे त्याने पाहिलें. मघाशीं त्याला ज्या झाडांचे शेंडे दिसले होते, ते एका भयंकर अरण्यांतले वृक्ष होते. पाय रक्तबंबाळ करून टाकणारे कांटे त्याला या अरण्यांतच लागले होते. त्या प्रवासाच्या स्मरणाने त्याच्या अंगावर कांटा उभा राहिला.

त्याने आपल्या पायांखालीं आणि आवती-भोंवतीं पाहिलें. खडे, दगड, खडक—पण कांटे कुठेंच नव्हते. बाहेरच्या सृष्टीप्रमाणें त्याच्या दृष्टींतही प्रकाश चमकूं लागला.

त्याने पुन्हा पुढे पाहिलें. मघाशीं धुक्या आड लपलेला सर्व भाग आता स्पष्ट दिसूं लागला होता. सुंदर बाग—तिच्यांत थुई थुई नाचणारें कारंजें—त्या कारंजाला आशीर्वाद देणारा देवळाचा कळस — बागेंत नाचणाऱ्या बालकाच्या अंधुक आकृती —

तो त्या दिशेने धांवतच सुटला. त्याच्या डोळ्यांत नाचणाऱ्या आनंदावरून त्याच्या पायांची चाळण झाली आहे हें कुणालाही खरें वाटलें नसतें!

# १६

## निसर्ग !—

वर्तमानपत्रें विकणारीं पोरें अहमहमिकेने ओरडत होतीं—

**नवऱ्याचा खून!**

**पदवीधर बाइने केलेला नवऱ्याचा खून!**

ही बातमी मोठमोठ्याने ओरडून सांगतांना प्रत्येक पोराच्या चेहऱ्यावर आनंदाची छटा चमकून जाई. रस्त्याने जाणारा येणारा प्रत्येक मनुष्य ती बातमी ऐकून थांबे, थांबल्याबरोबर त्याचा हात खिशांत जाई आणि घाईघाईने दोन पैसे काढून तो मनुष्य जवळजवळ पोराच्या हातांतून अंक हिसकावूनच घेई.

अशा वेळीं त्या पोरांना वाटे – दररोज अशी बातमी ओरडायला मिळाली तर आपली अगदी चंगळ होईल! मुसोलिनी, हिटलर, महात्मा गांधी, अमेरिकेंतला धरणीकंप, स्पेनमधली लढाई, रक्ताचा पाऊस, इतकें सारें एका अंकांत असलें तरी तो अंकसुद्धा असा तडाक्याने खपत नाही. कितीहि ओरडलें तरी रस्त्याने जाणारा एखाददुसरा मनुष्य आपल्याकडे पाहिलें न पाहिलें असें करतो आणि पुढे निघून जातो. पण आज?

आज वर्तमानपत्रें विकणारा प्रत्येक पोरगा बडा मनुष्य झाला होता. त्याचा स्वर कानीं पडतांच लोक पटापट थांबत होते, त्याच्याकडे क्षणभर आश्चर्याने पाहात होते आणि भराभर अंक विकत घेत होते!

मनुष्यमात्राला पराक्रमाची हौस असते. ती तृप्त होण्याचे प्रसंग सुखासुखीं येतात असें नाही. वर्तमानपत्रें विकणारीं पोरें आज मोठ्या आनंदांत होतीं याचें कारण त्यांना आज चार पैसे जास्ती मिळणार होते एवढेंच नव्हतें! तर आजची सबंध सकाळ त्यांनी सारी मुंबई गाजविली होती.

दुकानांत, कचेऱ्यांत, शाळांत या एकाच बातमीची लोक दिवसभर चर्चा करीत होते. म्हाताऱ्या माणसांचें म्हणणें–हा वाढत्या स्त्रीशिक्षणाचा परिणाम!

तरुण मनांत म्हणत होते–एवढ्यासाठीच घटस्फोट हवा! नवरा-बायकोंचें पटनासें झाल्यावर त्यांना एका घरांत डांबून ठेवणें म्हणजे दोन वेड्या माणसांना साखळदंडाने एकत्र बांधून ठेवण्यासारखेंच नाही का? त्या दोन माणसांपैकी वेडाच्या लहरींत कोण कुणाचा गळा दाबील याचा काय नेम आहे?

संध्याकाळच्या वर्तमानपत्रांनी या प्रकरणाची सविस्तर माहिती प्रसिद्ध केली. सकाळपेक्षाहि संध्याकाळीं वर्तमानपत्राचे अंक अधिक खपले.

एका जिल्ह्याच्या गावीं हा प्रकार घडला होता. बायकोचें नांव होतें कमल देशपांडे. मास्तरीण होती ती! तिचा नवरा विश्वनाथ देशपांडे गेलीं दोन वर्षें आजारीच होता. तो घरांतून बाहेरसुद्धा पडत नसे. बाईला मूलबाळ कांही नव्हतें; पण मुलासाठी म्हणून तिने थोडीथोडी अफू विकत घेतली. सुशिक्षित बाई मुलाला बाळगोळी देते याच गोष्टीवर आधी कुणाचा भरंवसा बसणें शक्य नाही. त्यांत मूल नसतांना तें आहे असें सांगून अफू विकत घेण्याचें या बाईला काय कारण होतें?

बातमीदारानें लिहिलें होतें–'कारण एकच होतें. आपल्या वाटेंतला नवऱ्याचा कांटा तिला दूर करावयाचा होता. नवऱ्याला अफू देऊन पुन्हा त्याच्यासाठी रडण्याचा केवढा कांगावा या बाईने केला! त्याला इस्पितळांत नेल्यावर एखाद्या अडाणी बाईप्रमाणे डॉक्टरांचे पाय धरून ती म्हणाली, "त्याना वांचवा हो!" हें नाटक तिने इतकें बेमालूम केलें कीं बोलून सोय नाही! पण नवरा घराबाहेर पडत नसल्यामुळे त्याच्या पोटांत गेलेली अफू घरांत कशी आली हा प्रश्न होताच! त्याचें उत्तर तिला कांही केल्या देतां येईना.

त्या अफूने बाईचें नाटक किती खोटें होतें हें सिद्ध केलें.'

*　　　*　　　*

खुनाच्या या विस्तृत माहितीने सकाळच्या आगींत तेलच पडलें. प्रत्येक सामान्य वाचक मनामध्ये भडकून म्हणत होता, "चौकशीसुद्धा न करतां या बाईला फाशीं देऊन टाकावं!"

पण असामान्य माणसांत मात्र सूक्ष्म मतभेद झाले होते. शिक्षिका आणि सुप्रसिद्ध लेखिका कुमारी उषा घाटे यांच्या बैठकींत तर हे मतभेद अगदी उतूं जात होते.

उषाबाईच्या बैठकींत एक बत्तीस वर्षांचा अविवाहित तरुण, एक छत्तीस वर्षांचा कुरूप बायकोचा नवरा व एक चाळीस वर्षांचा विधुर अशी तीन मंडळी बसली होती. प्रत्येकजण तावातावाने या बातमीविषयीच बोलत होता. अविवाहित वीर लग्नसंस्था का नको याचें हें उत्तम उदाहरण आहे असें घसा खरवडून म्हणाले. विवाहित गृहस्थांनी "खून हा कांही झालं तरी खूनच!" हें निरनिराळ्या रीतीने सांगितलें. आपण उषाबाईच्या बैठकींत फार वेळ बसतों हें आपल्या बायकोला आवडत नाहीं हें त्यांना पक्कें ठाऊक होतें. त्यांना वाटलें असावें—सुशिक्षित बाईसुद्धा बेफाम होऊन असली भयंकर गोष्ट करते, मग आपली अडाणी बायको केव्हां काय करील कुणाला ठाऊक। भाजी चिरायला बसायच्या वेळीं विळी घेऊन ती आपल्या अंगावर धावून आली तर?—

विधुर गृहस्थांना या शुष्क वादविवादाचा कंटाळा आला होता. ते मनांत म्हणत होते— देवीच्या मंदिरात आल्यावर तिचें ध्यान करायचें, तिची पूजा करून तिला प्रसन्न करून घ्यायचें की बाजारांत तुरीचा भाव काय आहे याची चर्चा करीत बसायचें!

बिचारा प्रौढ भाविक भक्त!

उषाबाईहि या चर्चेतच सामील झाल्या होत्या. दररोजचा हास्य-विनोद, चहापाणी, सिनेमाला जाण्याचे बेत, सारें सारें विसरून गेल्या होत्या त्या!

वर्तमानपत्रांतल्या मजकुरावरून नजर फिरवीत आणि आपल्या भक्त-गणाला चकित करीत त्या एकदम उद्गारल्या—

"अगबाई!"

तिघेहि प्रेमवीर गडबडले.

उषाबाईंना डास चावला की केसांतला आकडा बोचला की काय झालें तें कुणालाच कळेना! उषाबाईंनी तोंड उघडले नसतें तर ब्रह्मचारी डॉक्टर आणायला धांवला असता, विवाहित गृहस्थ होमिओपाथी इलाज करणें बरें असें सांगत राहिले असते आणि विधुरांनी कांदा चेचून बाईच्या नाकाला लावावा अशी सूचना केली असती!

पण आपल्या भक्तांना उगीच त्रास व्हावा अशी देवतेची इच्छा नव्हती.

ती हसतहसत म्हणाली—

"ही कमल माझ्याच वर्गात होती की!"

"कुठली कमल?" ब्रह्मचारीबुवांनी प्रश्न केला.

"या बातमींतली!"

तिघांचेहि चेहरे फोटो घेण्यासारखे झाले. बाकी एखादा फोटोग्राफर तिथे असता तरी त्यांनी त्याला आपला फोटो मात्र काढूं दिला नसता! त्या फोटोंत ऊषादेवी नाहीत—

उषादेवी हसत बोलत होत्या, "कॉलेजांत असतांना सभ्यपणाचा केवढा आव आणित होती ही कमल! कुणी मुलानं कांही वस्तु दिली तर ती कधी घ्यायची नाही, फिरायला अगदी एकट्यानंच जायची, सिनेमाला सुद्धा कुणा मुलाबरोबर गेली नाही कधी! कादंबरी दिसली की नाक मुरडून शास्त्रीय पुस्तकं वाचत बसे ती!"

"अफू देऊन नवऱ्याला मारतां येतं एवढंच शास्त्रीय ज्ञान तिला मिळालेलं दिसतं!" विवाहित गृहस्थ उद्गारले.

उषाबाईंनी नुसते स्मित केलें.

ब्रह्मचाऱ्यांनी केला, "असली बाई लग्नाच्या फंदांत पडली तरी कशाला!"

"नि लग्न तरी कुणाशीं केलंन्? कवीशीं!"

"कवीशीं?" तिघांच्याहि तोंडून एकदम बाहेर उद्गार आला.

"हो! विश्वनाथ या नांवानं कविता येतात ना मासिकांत, त्या तिच्याच नवऱ्याच्या. त्याची नि माझी एका मासिकाच्या कचेरींत गांठ पडली होती एकदा. अगदी हाडकुळा, अबोलका असा मनुष्य होता तो!"

"तरीच!" ब्रह्मचारी उद्गारले.

"तरीच काय?"

"आत्ता सापडलं या खुनाचं कारण. उषाबाई, यांत कांहीतरी प्रेमाची भानगड आहे. कोर्टात खूप रंगेल ही केस!"

उषाबाईंनी नुसतें स्मित केलें.

विधुर गृहस्थ इतका वेळ एकसारखें डोकें खाजवीत होते. ते एकदम अंगांत संचार झाल्याप्रमाणे म्हणाले, "हां! आठवलं!"

"तुमचीहि त्या नवऱ्याशीं गांठभेट पडली होती काय?" संसारी गृहस्थांनी विचारलं.

"छट्! दुसरीच गोष्ट आठवत होतों मी!"

"त्या कमलची ओळख-बिळख आहे वाटतं?" ब्रह्मचाऱ्यांनी प्रश्न केला.

"तुम्हांला दुसरं काय सुचायचंय्? अहो, त्या नवऱ्याची कविता नुक्ती कुठंतरी वाचली असं वाटत होतं. कुठं तें कांही नक्की स्मरेना! शेवटीं एकदम ध्यानांत आलं—"

"कुठं आलीय् त्याची कविता?"

विधुरांनी हातांत नळी करून धरलेल्या एका मासिकाच्या अंकाचें चौकोनांत रूपांतर केलें. त्या अंकाच्या पहिल्याच पानावर 'विश्वनाथ' असें खालीं नांव असलेली एक कविता होती.

उषाबाईनी कवितेच्या नांवाकडे नजर वळविली. लगेच त्या कवितेंत रंगून गेल्या.

ब्रह्मचारीबुवांनी मध्येच प्रश्न केला, "प्रेमगीत आहे वाटतं?"

कपाळाला आठी घालून उषाबाईनी उत्तर दिलें, "कवितेचं नांव 'निसर्ग' आहे!"

ब्रह्मचारी खो खो करून हसूं लागला. संसारी गृहस्थांनीहि त्याला साथ दिली.

ब्रह्मचारी उद्गारले, "फुलांबिलांचं वर्णन असेल झालं कवितेंत! या मूर्ख कवींना कांहीच कळत नाही! फुलं वाहायला देवता नसली म्हणजे हातांतल्या फुलांचे कसे निखान्यासारखे चटके बसतात! हे कवि लोक आकाशांतल्या तारकेच्या मागं धावत असतात. पृथ्वीवरल्या एखाद्या तारकेचा पाठलाग करा नी मग पोलिसांचा पाहुणचार कसा मिळतो तो पाहा म्हणावं!"

स्वारी अगदी रंगांत आली होती. पण उषाबाईनी कविता वाचायला सुरवात केल्यामुळे त्यांना आपल्या जिभेला लगाम घालावा लागला.

कवि म्हणत होता—

"नाही, मी मरणार नाही.

इतका वेळ अंधारांत तारका चमकत होत्या— जणु कांही मृत्यूच्या दारांत नाचणाऱ्या जीवनाच्या ज्योतीच!

पण आता?

आता पूर्वेकडे रक्तरंग दिसूं लागला आहे.

प्रियकराच्या पहिल्या चुंबनाने मुग्धेच्या मुखावर असेच लज्जेचे तरंग दिसत असतात.

पाखरांची गोड किलबिल ऐकूं येत आहे.

जणू कांही रमण-रमणींची एकांतांतील मोहक कुजबुजच !

प्रातःकालच्या वायुलहरी आपल्या मृदु स्पर्शाने अंग पुलकित करीत आहेत.

एकमेकांच्या बाहुपाशांत वल्लभ आणि वल्लभा याच आनंदाचा अनुभव घेत असतात ! नाही का ?

बागेंत कळ्या फुलूं लागल्या आहेत.

माझें मनहि त्यांच्याबरोबर फुलत आहे.

नाही, मी मरणार नाही."

कविता संपतांच सर्व स्तब्ध झाले. त्यांच्या मनावर एक प्रकारची मोहक गुंगी आली होती.

विवाहित गृहस्थांनी या तंद्रीचा भंग केला. ते म्हणाले, "बिचारा एकटा असता तर मेला नसता ; पण ही बायको – "

विधुर गृहस्थ उद्गारले, " ही साधीसुधी मास्तरीण राक्षसीण कशी झाली ?"

ब्रह्मचारी आपल्या उपास्य दैवताकडे वळून म्हणाले, " उषादेवीच याचा उलगडा करूं शकतील. आधीच माणसाचं मन समुद्राहूनहि खोल असतं; त्यांत स्त्रीचं मन म्हणजे—कसलेल्या कथालेखिकेशिवाय कुणालाच त्याचा थांग लागायचा नाही !"

भक्ताच्या स्तुतीमुळे प्रसन्न झाल्याने असो अथवा मनुष्याचें खरें अंतरंग आपल्यालाच कळतें असा लेखकांना जो अभिमान वाटत असतो त्यामुळे असो, उषादेवी म्हणाल्या, "इतकं कांही बिकट नाही हें कोडं!"

तिन्ही भक्त आश्चर्याने पाहूं लागले.

हसतहसत उषाबाई उद्गारल्या, "त्या मघाच्या कवितेतच उत्तर आहे याचं!"

श्रोत्यांच्या आश्चर्याचा पारा जाकोबाबादचा उन्हाळा दर्शवूं लागला.

एक सुस्कारा सोडून उषाबाई बोलत्या झाल्या– "निसर्ग!"

"म्हणजे?"

"पुरुषजात तेवढी खुळी! अहो, हा नवरा आजारी होता ना? त्याच्या आजारीपणांत या कमलचं प्रेम दुसऱ्या पुरुषावर जडलं. तो पुरुष नवऱ्याच्या डोळ्यांत सलूं लागला. तेव्हां–"

तिघांनीहि माना डोलावल्या.

*            *            *

उषाबाईंनीहि आपली गोष्ट लिहून होतांच ती वाचून पाहून मान डोलावली.

आतापर्यंतच्या स्वतःच्या कुठल्याहि गोष्टीवर त्या इतक्या खूष झाल्या नव्हत्या.

गोष्टीतल्या नायिकेचें नाव त्यांनी कुसुम ठेवलें होतें; तिला मास्तरिणीच्या ऐवजी नर्स केले होतें आणि तिचा नवरा कवि नसून चित्रकार आहे असें दाखविलें होतें. त्या नर्सचें प्रेम तिला ज्याची शुश्रूषा करावी लागते अशा एका श्रीमंत रोग्यावर बसनें आणि आपल्या वाटेंतला नवऱ्याचा कांटा दूर करण्याकरितां ती त्याला विष घालते. असा या गोष्टीचा कथाभाग होता.

आपली ही गोष्ट मोठी खळबळ उडवून देणार या आनंदांत उषाबाई ती एका मासिकाकडे पाठविण्याची तयारी करूं लागल्या.

पण मनुष्य आणि दैव यांच्यात नेहमीच आट्यापाट्यांचा खेळ सुरू असतो. उषाबाईच्या आनंदाला पहिल्याच पाटींत दैवानें पकडलें. त्याला मुकाट्यानें बाहेर जावे लागले.

त्या दिवशींच्या वर्तमानपत्रांनीं कमल देशपांडे निर्दोष असल्याची बातमी प्रसिद्ध केली होती. कवि विश्वनाथ देशपांडे यांनी अफू खाऊन आत्महत्या केल्याचा पुरावा मिळाला होता म्हणे !

उषाबाईना 'निसर्ग' ही कविता आठवली. त्यांच्या मनांत आले—छेः ! एवढा आशावादी कधीहि आत्महत्या करणार नाही. प्रातःकालचे सुंदर दृश्य पाहिल्याबरोबर ज्याचा आत्मा फुलत होता, तो मनुष्य अफू खाऊन जीव देईल ?

छेः ! यांत कांहीतरी रहस्य असलें पाहिजे.

ज्या पुरुषावर कमलचें प्रेम बसलें होतें त्याने कांहीतरी युक्तीने तिची सुटका केली असावी !

पण ती कोणत्या उपायाने केली असेल ? विश्वनाथाने आत्महत्या केली हें खरें कशावरून ? त्याची 'निसर्ग' ही कविता कोर्टाने वाचली नसावी ! या न्यायाधिशांना काव्य, मानसशास्त्र कांही म्हटल्या कांही कळत नाही त्यांनी नुसतें पिनलकोड पाठ म्हणावे !

* * *

उषाबाई आणि त्यांचे तीन मित्र यांच्यांत कमलच्या निर्दोषीपणाविषयीं अशा प्रकारची कितीतरी चर्चा झाली ! पण ती निर्दोषी आहे हें एकालाहि पटेना !

नदीच्या पाण्यांत एखादा धोंडा पडला म्हणजे एकदा मोठा आवाज होतो, क्षणभर पाण्याच्या लाटा वर उसळतात आणि पुन्हा नदीचा प्रवाह

शांतपणें वाहूं लागतो. कमलच्या बाबतींत समाजाचें असेंच झालें होतें. कमलने नवऱ्याचा खून केला या गोष्टीवर समाजाने जसा विश्वास ठेवला होता, तशी विश्वन.थाने अात्महत्या केली ही गोष्टहि त्याने आता खरी मानली, किंबहुना तो हें • रें विसरूनहि गेला!

या प्रकरणाची राहूनराहून आठवण होई ती उषाबाईंना व त्यांच्या मित्रांना! त्या सर्वांचें एक ठाम मत झालें होतें—मानसशास्त्राच्या दृष्टीने पाहिलें तर हा खूनच असला पाहिजे. 'निसर्ग' या कवितेंत विश्वनाथाने मनुष्याची जगण्याची तीव्र इच्छा किती सुंदर रीतीने व्यक्त केली होती! असा मनुष्य ती कविता लिहिल्यानंतर अवध्या एका महिन्याच्या आंत आत्महत्या करतो! छे:! बोंडल्याने दूध पिणारें मूलसुद्धा आत्महत्येच्या या बनावट गोष्टीवर विश्वास ठेवणार नाही!

कमलविषयी उषाबाईंनी मनांतल्या मनांत असा निकाल दिला असल्यामुळे ती एके दिवशीं संध्याकाळीं त्यांच्यापुढे दत्त म्हणून उभी राहिली तेव्हा त्या स्तंभितच झाल्या!

थोड्या वेळाने त्यांनी विचारलें, "एकटीच आलीस मुंबईला?"

"एकटीच आहे मी जगांत आता!"

उषाबाईंना आपल्या गोष्टींतला नर्सवर पेम करणारा ...मत रोगी दिसूं लागला. पण त्यांनी प्रश्न केला तो मात्र अगदी निराळा!

"थोरला भाऊ आहे ना तुला?"

"आहे की! पण त्याच्या मनाविरुद्ध लग्न केलं होतं मी!"

"मनाविरुद्ध! विश्वनाथ चांगले कवि होते की!"

" कविता कांही गरीब मनुष्याला श्रीमंत करीत नाही. लग्न झालं त्या दिवशीं दादा मला म्हणाला ' कमल, आजपासून मी तुला मेलों नी तूं मला मेलीस ! ' "

उषाबाईनी चुकचुक करीत म्हटलें,

" माणसं किती दुष्ट असतात ! "

कमल हसून म्हणाली,

" उषा, माणसांचा दुष्टपणा पुरवतो; पण–"

"पण काय ?"

"सारंच सांगते तुला ! मुंबईत तुझ्या ओळखीनं एखादी नोकरी मिळेल म्हणून आलेंय् मी. लेखिका म्हणून तूं प्रसिद्ध आहेस. त्यामुळें आयता पत्ता मिळाला तुझा !"

आवंढा गिळून कमल बोलूं लागली,

"सख्ख्या भावानं 'तूं मला मेलीस' म्हणून सांगितलं तेव्हा मी डोळ्यांतून टिपसुद्धा गाळलं नाही. माझं विश्वनाथांच्यावर प्रेम जडलं होतं. त्यांनाहि मी मनापासून हवी होते. ते गरीब असले तरी त्यांच्या कविता किती सुंदर–मला वाटलं, साऱ्या जगानं जरी मला दूर लोटलं तरी मी विश्वनाथाची पत्नी आहे या अभिमानावर मी आनंदानं जगेन. माझ्या वांट्याला जरी शिळी भाकरी आली तरी त्यांच्या सहवासांत ती मला अमृतापेक्षाहि गोड लागेल. आमचं दोघाचंच एक सुंदर जग आम्ही निर्माण करूं. त्या जगांत आम्हां दोघांमध्ये कुणीहि येणार नाही, पण–पण–दोन वर्षांपूर्वी –"

कमलच्या डोळ्यांत अश्रु तरळत होते.

उषाबाईनीं विचारलं —

" तुझ्यावरलं त्यांचं प्रेम नाहीसं झालं ?"

# आमचीं इतर पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| १ | आज्ञापत्र—(मराठेशाहींतील राजनीतीचा एक उत्कृष्ट नमूना) | १२ आणे |
| २ | तुकाराम-मुक्तेश्वर ( निवडक वेंचे ) | १० आणे |
| ३ | पतितेचें हृदय (कादंबरी) बा. सं. गडकरी | १॥ रु. |
| ४ | गांधीवाद ( पुरोगामी विचार-माला ) | ६ आणे |
| ५ | श्री मेहेरबाबा (चरित्र व तत्वज्ञान) डॉ. देशमुख पी. एच्. डी. | १॥ रु. |
| ६ | बोबडे यांचा कविता संग्रह | १॥ रु. |
| ७ | सन १८५७ (नाटक) वि. रा. हंबर्डे | १२ आणे |
| ८ | बिगारीचा बैल ( नाटक ) वि. रा. हंबर्डे | ६ आणे |
| ९ | आंदोलनें (लघुकथा) द. ग. प्रधान | १ रु. |
| १० | ऋग्वेदांचा संदेश अप्रबुद्ध | ३ रु. |
| ११ | रघूजी भोंसले श्री. दळवी | १२ आणे |
| १२ | विकसन कथासंग्रह | १ रु. |
| १३ | बायकी कावा (नाटक) ओक | १ रु. |
| १४ | सामाजिक सीमोल्लंघन (नाटक) पंडित | १ रु. |
| १५ | आपलें शरीर (डॉ. सहस्त्रबुद्धे) | १ रु. |
| १६ | आपलें आरोग्य (कर्वे व कुकडे) भाग १, २, ३. | २॥ रु. |
| १७ | धुडगूस—(घटस्फोटावरील लेखसंग्रह) | १॥ रु. |

( याशिवाय मराठी भाषेंतील इतर सर्व पुस्तकें आमच्याकडे मिळतील. ग्रंथालयांना विशेष सवलती. )

# आमचें वाङ्मय



| | | | |
|---|---|---|---|
| १ | सागराच्या लाटा | प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई | १ |
| २ | गुलाब गेंद | जयवन्तराव सरदेसाई | १२ |
| ३ | वादळांतील नौका | प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई | १ |
| ४ | कुळागर | सं. बा. द. सातोस्कर | १ |
| ५ | वैमानिक हल्ला | भा. वि. वरेरकर | १। |
| ६ | निशिकांताची नवरी | अनन्त काणेकर | १० |
| ७ | तुटलेले तारे | अनन्त काणेकर | १ |
| ८ | कारंजाचे तुषार | व्यं. अ. पै रायरकर | १। |
| ९ | किनाऱ्यावर | प्रो. वि. द. साळगांवकर | १ |
| १० | धुक्यांतून लाल ताऱ्याकडे | अनन्त काणेकर | १। |
| ११ | उंबराची फुलें | ह. वि. देसाई | १ |

४ आणे प्रवेश फी भरून कायम ग्राहक होणाऱ्
'साहित्या'चें प्रत्येक पुस्तक पाऊणपट किंमतीस मिळेल.

'सागर साहित्य' कार्यालय,
त्रिभुवन रोड, मुंबई ४.